# अर्धवर्तुळे

( कथासंग्रह )



लेखकः—

प्रभाकर पाध्ये, बी. ए.



एप्रिल १९५१

किंमत अडीच रुपये

स्कूल व कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर.

रामभाऊ आणि सुधाबाई जोशी यांस—

## थोडा खुलासा

१९४४ आणि १९४५ सालीं, माझे दोन कथासंग्रह पाठोपाठ प्रसिद्ध झाले. त्यानंतर मी दैनिकांत प्रवेश केला—आणि, आतां सहा वर्षांनीं, माझा हा तिसरा कथासंग्रह प्रसिद्ध होत आहे.

या कथासंग्रहाचे ' **अर्धवर्तुळें** ' हें नांव श्री. वा. ल. कुलकर्णी यांनीं दिलेलें आहे. स्वतःच्या कथासंग्रहासाठीं राखून ठेवलेलें नांव त्यांनीं माझ्या संग्रहासाठीं बहाल करावें यांत त्यांचें स्नेहाळ औदार्यच दिसून येतें.

या पुस्तकाचें मुखपृष्ठ करून दिल्याबद्दल मी माझे चित्रकार स्नेही श्री. गोडसे यांचा आभारी आहे.

७७४, टिळक रोड
दादर, मुंबई १४

**प्रभाकर पाध्ये**

# १ वेडी आशा

“ कृ. शि. सा. न. वि. वि.

काल दुपारीं १॥ वाजतां सौ. रोहिणी हें जग...”

—पुढचा मजकूर वाचण्याचे त्राण श्रीधरकाकांच्या नजरेंत उरलें नाहीं. ते तसेच निर्जीव नजरनें हातातल्या पत्राकडे पाहत राहिले. “ काय ! काय लिहिलंय् ? ” या रमाकाकूंच्या आर्त प्रश्नाला उत्तर देण्याचा त्यांनीं यत्न केला, त्यांच्या तोंडाची थोडी हालचालहि झाली, पण त्यांतून शब्द फुटला नाहीं.

रमाकाकूंच्या तोंडांतून एकदम ‘ रोहिणी ’ अशी किंकाळी बाहेर पडली, त्या जमिनीवर पडल्या आणि रडूं लागल्या.

श्रीधरकाकांच्या तोंडून रडें फुटलें नाहीं. त्यांची नजर तशीच स्तब्ध होती. पण एखाद्या खडकांतून थेंब थेंब पाणी गळावें तसे त्यांच्या डोळ्यां-तून अश्रु ठिपकूं लागले.

× × ×

रोहिणी ही त्यांची एकुलती एक मुलगी. उतारवयांत नवसासायासांनीं झालेली. त्यांच्या आयुष्यांतला बराचसा अर्थ रोहिणींत जमा झाला होता. रोहिणीनें त्यांच्या जीवनांतील एक तीव्र उणीव भरून काढली होती. इतर दृष्टींनीं त्यांना कांही कमी नव्हतें. पिढीजात खोती होती, शेतवाडी होती आणि सावकारीहि होती; पण मुलाच्या अभावीं त्यांच्या आयुष्यावर उदा-

सीनतेचें नित्य सावट पसरलें होतें. अपत्यहीनतेमुळें त्यांच्या वृत्ति थोड्या विपरीतच बनल्या होत्या. एरवीं व्यवहारांत थोडेसे कठोर भासणारे श्रीधरकाका लहान मूल पाहिलें कीं एकदम कोमल बनत आणि त्याच्यावर वात्सल्याचा वर्षाव करीत. उलट रमाकाकूंचा स्वभाव विलक्षण तुसडा बनला होता. आसपासच्या मुलांना त्या सारख्या हिडिसफिडिस करीत. श्रीधरकाकांची ही प्रेमळ माया आणि रमाकाकूंचा विलक्षण वचक यामुळें गांवांतल्या मुलांना त्यांचें घर मधमाशांच्या मोहळासारखें वाटे—मध काढण्याची तर इच्छा व्हावी, पण माशांच्या डंखाच्या भीतीनें जवळ जाण्याचा धीरच होऊं नये.

पण रोहिणीचा जन्म झाला आणि त्या घरांत नक्षत्रांचा आनंद फुलला. श्रीधरकाका आणि रमाकाकू यांच्या साऱ्या वृत्तिच बदलून गेल्या. रमाकाकू आतां शेजाऱ्यांच्या मुलांकडे थोड्या सोशिकपणेंच नव्हे तर ममतेनें पाहूं लागल्या, आणि श्रीधरकाकांची जगाकडे पाहण्याची सारी दृष्टिच पालटून गेली. आपलीं शेतीभाती आणि सावकारी याच्या बाबतींत आजवर ते अनास्थेनें आणि कठोरपणानें वागत—पण आतां त्यांच्या वर्तणुकींत औदार्य आणि हिशेबीपणा यांचें मजेदार मिश्रण दिसू लागलें. जगाबद्दल त्यांना एक नवीनच आपलेपणा वाटूं लागला.

त्यांच्या घरामागें एक छोटीशी बाग होती. त्या बागेची शोभा त्यांना आतां प्रथमच जाणवूं लागली. तिच्या खालच्या बाजूनें स्वच्छ प्रसन्न पाण्याचा एक ओढा वाहत होता आणि जरा पलीकडेच त्याच्यावर एक लहानसा पूल होता सायंकाळच्या वेळीं त्या पुलावर उभें राहिलें म्हणजे सूर्याच्या मावळत्या किरणांनीं त्या बागेवर पसरलेली सोनेरी माया खूप सुंदर दिसे. श्रीधरकाका अलीकडे संध्याकाळीं त्या पुलावर जाऊन बसूं लागले.

—ते असे बसले कीं, त्यांचें लक्ष पुनः पुनः त्या बागेच्या कोपऱ्यांत, ओढ्याच्या कांठीं असलेल्या पिंपळाच्या झाडाकडे जाई. सायंवाताच्या लहरींवर नाचणारीं पिंपळाचीं पानें मावळत्या सूर्याच्या प्रकाशांत तेजाचीं फुलपांखरें वाटत, पण श्रीधरकाकांचें लक्ष त्यांच्यावर फार वेळ स्थिरावत

नसे. तें पिंपळाच्या पायथ्याशीं जाई आणि तेथे उभ्या केलेल्या दगडाच्या मूर्तीचा वेध घेऊं लागे. ती विष्णूची मूर्ति होती. किती पिढ्या ती तेथें होती हें कोणालाच माहीत नव्हतें. पूर्वी केव्हां तरी ओढ्याच्या पुरानें ती वाहून आली असा प्रवाद होता. नवसाला पावण्याबद्दल तिची ख्याति होती. श्रीधरकाका आणि रमाकाकू यांनीं मूल व्हावें म्हणून ज्या अनेक देवदेवतांना नवस केला होता त्यांत अर्थात् ही मूर्ति होती आणि रोहिणीचा जन्म जेव्हां अक्षय्यतृतीयेला झाला तेव्हां ही विष्णूची मूर्तीच अखेरीस आपल्या नवसाला पावली अशी त्या भाविक जोडप्याची खात्री झाली.

एक दिवस श्रीधरकाका पुलावर बसलेले असतांना त्या मूर्तीला केलेला नवस फेडण्याची एक कल्पना त्यांच्या मनांत आली. दुसऱ्या दिवसापासून त्या पिंपळाच्या पायथ्याशीं एक छोटेंसें मंदिर बांधण्यास सुरवात झाली आणि अक्षय्यतृतीयेला—रोहिणीच्या पहिल्या वाढदिवशींच—त्या मूर्तीची त्या मंदिरात विधिपूर्वक प्रतिष्ठापना झाली. त्या दिवसापासून त्या कुटुंबांत अक्षय्यतृतीयेला एक विशेष महत्त्व प्राप्त झालें.

अशीं वीस वर्षें गेलीं. रमाकाकू रोहिणीला गळ्यांतल्या मंगळसूत्राप्रमाणें जपत होत्या—आणि श्रीधरकाकांच्या साऱ्या आशाआकांक्षा तिच्या भोंवती गोळा होत होत्या. ती पंधरा सोळा वर्षांची झाल्यापासूनच त्यांनीं घरजांवई शोधण्यास सुरवात केली. पुष्कळ तरुण मुलगे आणि त्यांचे आईबाप यांची आशाळभूत नजर त्यांच्या स्थावर–जंगमावर फिरत होती, पण श्रीधरकाका आणि रमाकाकू यांच्या मनास एकहि मुलगा येईना. श्रीमंत स्थळाची त्यांना अर्थातच अपेक्षा नव्हती, पण कुलशीलवान् आणि होतकरू असा मुलगा त्यांना हवा होता. त्याचें घरचें कांहीं असण्यापेक्षां नसललेंच बरें, कारण मग तिकडचे कांहीं पाश उरत नाहींत. अखेरीस असा एक मुलगा पंचक्रोशींतच आढळला. बालपणींच आईबापाला मुकलेला हा मुलगा मुंबईज एका नातेवाइकाकडे राहून शिकत होता. यंदाच तो बी. ए.ला बसला होता.

मुलगा पसंत पडला. मुलानेंहि मुलगी पसंत केली. पत्रिका जमल्या आणि एका सुमुहूर्तावर रोहिणीचा विश्वनाथ सरमोकादम याच्याशीं विवाह झाला. लग्नानंतर कांहीं दिवस सासुरवाडीला राहून विश्वनाथ बँकेंतल्या नोकरीवर रुजू होण्यासाठीं मुंबईला निघून गेला. चातुर्मासानंतर रोहिणीहि आपला नवा संसार मांडायला गेली. त्यानंतर कांहीं दिवस मुंबईला आणि आणि कांहीं दिवस माहेरीं असें तिचें जीवन सुरू झालें आणि श्रीधर-काका–रमाकाकूंच्या आयुष्यांत एक नवाच कृष्णशुक्ल पक्ष सुरू झाला.

रोहिणीचें लग्न होऊन ती मुंबईला गेल्यापासून त्या वृद्ध जोडप्याला थोडें ओकें ओकें वाटू लागलें, पण जांवयाच्या प्रेमाचा एक नवाच आसरा त्यांना आता लाभला होता. रोहिणी त्यांची एकुलती एक मुलगी. संसारांतील सारी माया आणि आनंद तिच्यावर एकवटला होता. पण सुखाचें चांदणें फुललेलें असतांना मध्येंच उदासपणाचा ढग मनावर सावली पाडून जातो त्याप्रमाणें रोहिणीचें कोडकौतुक करतांना ही अखेरीस दुसऱ्याची होणार हा विचार मधूनच त्यांना दश करून जात असे. अशा वळीं रोहिणीऐवजीं आपल्याला एकादा मुलगा असता तर, ही कल्पना त्यांच्या मनांत येई. विश्वनाथनें त्यांच्या आयुष्यांतली ही उणीव भरून काढली. लग्नानंतर अल्पावधींतच सासुरवाडीची त्याला घरच्या सारखी ओढ वाटू लागली. श्रीधरकाकांची शेतवाडी, त्यांची सावकारी, बागबागायत, गुंवासेरें यांचा परामर्श तो पोटच्या मुलाप्रमाणें घेऊं लागला. दोनतीन वर्षांत त्यांच्या घरामागच्या बागेंत विलायती फुलझाडें, घरासमोर अंगणापलीकडे आंब्यांचे कलम आणि विहिरीवर पाणघर दिसूं लागलें. दर वर्षीं रजा घेऊन येतांना सासुरवाडीची शेती सुधारण्याची कांहीं तरी योजना तो घेऊन येई आणि दर वर्षीं परत जातांना त्यांच्या संसारावर आपल्या आपुलकीची कांहीं तरी खूण तो ठेवून जाई. ती दृष्टीस पडली कीं श्रीधरकाका आणि रमाकाकू यांचें अंत:करण एका नव्या जिव्हाळ्यानें भरून येई आणि आजवर न अनुभव-लेलें कांहीं तरी सुख प्रत्ययास येत आहे असें त्यांना वाटे. अल्पावधींतच त्यांचा जांवयावर पोटच्या मुलाप्रमाणें जीव जडला– आणि दोन अडीच

वर्षांनीं जेव्हां चंद्रशेखरचा जन्म झाला तेव्हां त्यांच्या सुखाला पारावार उरला नाहीं. जीवनांत त्यांना एका अननुभूत तृप्तीचें समाधान वाटूं लागलें!

× × ×

श्रीधरकाका आणि रमाकाकू यांच्या जीवनांतलें हें समाधान दीडदोन वर्षें टिकलें नाहीं तोंच रोहिणीच्या मृत्यूनें त्यांच्यावर घाला घातला. एकदम एकाएकी सोसाट्याचा वारा यावा आणि त्यानें पटापट सारे दिवे विझून जावे तसें त्यांचें झालें. त्यांच्या जीवनावर एकाएकीं भयंकर काळोख पसरला आपल्यावर चारी बाजूंनी कसल्या तरी काळ्याकुट्ट अभिन्न आकृति चालून येत आहेत, अशी कांहीतरी विचित्र जाणीव त्यांना होऊं लागली—एकदम एका काळरात्रीं वणव्याचा फेरा येऊन जावा आणि जिकडे तिकडे काळा विध्वंस पसरलेला दिसावा तसें त्यांना झालें. या विध्वंसांत गेलें काय आणि उरलें काय याचाच त्यांना बोध होईनासा झाला!

पांचसहा दिवसांनीं विश्वनाथ चंद्रशेखरला घेऊन आला. त्यांना पाहिल्यावर त्यांचें सारें दुःख परत नव्या उसळीनें बाहेर आलें, तशीच आपल्या करपलेल्या जीवनांत कांहीं चेतना शिल्लक आहे याचीहि त्यांना प्रथमच जाणीव झाली. वणव्याच्या होरपळींतून एकदोन अंकुर शिल्लक राहिले आहेत असें वाटलें. काळवंडलेल्या जीवनाला प्रकाशाची किनार दिसूं लागली.

विश्वनाथ आठच दिवस होता, पण तेवढ्या अवधींत जीवनावरचा त्यांचा ढांसळलेला विश्वास पुनः उभा करून तो गेला. त्या आठ दिवसांत तो रोहिणीबद्दल फारसा बोलला नाहीं. तिच्या आजारीपणाबद्दल विचारलेल्या प्रश्नांना तो फक्त मोजकीं उत्तरें देत असे. पण याचें त्यांना विशेषसें आश्चर्य वाटलें नाहीं. रोहिणीबद्दल तो फारसें कधीं बोलतच नसे. रोहिणीनें त्याचें जीवन त्यांच्याशीं बांधलें होतें खरें, पण लवकरच त्यांत स्वतंत्र जिव्हाळा निर्माण झाला होता, आणि आतां हा धागा तुटला तरी तो जिव्हाळा आटूं लागल्याचें कांहीं लक्षण दिसलें नाहीं. उलट, त्याच्या आपल्यावरील भक्तींत भरच पडली आहे असें त्या वृद्ध जोडप्याला वाटलें. त्या आठ दिवसांत तो श्रीधरकाका आणि रमाकाकू यांच्या दुःखानें हळुवार झालेल्या

भावनांना जपून वागत होता आणि त्याची ती अवस्था पाहून त्यांचें दुःखहि थोडें कमी झालें. परत जायच्या आदल्या दिवशीं आपल्या मुंबईच्या संसाराची काय व्यवस्था लावूं असें जेव्हां त्यानें श्रीधरकाकांना एकाद्या आज्ञाधारक मुलाप्रमाणें विचारलें तेव्हां तर त्यांना त्याच्या निष्ठेचा एक नवाच प्रत्यय आला आणि मुंबईला गेल्यावर त्याचीं आपुलकीनें ओथंबलेलीं पत्रें जेव्हां नियमित येऊं लागलीं तेव्हां त्याच्या आयुष्यांना पूर्वीं कधीं वाटला नव्हता इतका विश्वनाथचा आधार वाटूं लागला.

आणि चंद्रशेखरनेंहि त्यांच्या भकास जीवनांत थोडा गोडवा उत्पन्न केला. थोड्याच अवधींत आजाआजीचा त्याला लळा लागला आणि त्याच्या बाललीलांनी आणि बोबड्या बोलानीं त्यांच्या व्यथित अंतःकरणास थोडा विरंगुळा वाटूं लागला. शेखरनें त्यांच्या शोकविव्हळ आयुष्यास बरीच ओढ लावली. त्याच्या इवलाल्या गोड खेळकर मूर्तीनें त्यांच्या दुःखास विसर पडूं लागला. अर्थात् एकादे वेळीं अवचितच रोहिणीची अगर विश्वनाथची आठवण काढून तो रडूं लागे आणि मातृमुखी शेखरचा तो अश्रूंनीं भरलेला म्लान, विकल चेहरा पाहिला कीं रोहिणीचें बालपण आठवून त्यांच्या जीवाचें पाणी पाणी होई. मधूनच त्यांचें मन, कधीं कधीं निरभ्र आकाश एकदम भरून येतें तसें रोहिणीच्या स्मृतींनीं भरून येई आणि त्यांच्या जीवाचा दाह होऊं लागे. पण एकंदरींत विश्वनाथची आपुलकी आणि शेखरच्या बाललीला यांनीं त्यांच्या व्याकुळ जीवनांत बरीच प्रसन्नता ओतली.

दर वर्षाप्रमाणें यंदाहि विश्वनाथ रजा घेऊन अक्षय्य तृतीयेला कोंकणांत आला तेव्हां तर श्रीधरकाका आणि रमाकाकू यांना धन्य धन्य वाटलें. अक्षय्य तृतीयेच्या समारंभांत यंदा कोणाचाच जीव नव्हता, पण आतां तो एक नित्याचा धार्मिक विधि झाला होता, आणि तो अंतरतां येत नाहीं म्हणून नेहमीप्रमाणें साजरा करण्यांत आला. जड हृदयानें आणि उदास चित्तानेंच त्या वृद्ध दांपत्यानें सारे विधि पार पाडले. विश्वनाथनें मात्र कार्यांत कांहीहि कमी पडूं नये म्हणून शक्य तितकी दक्षता बाळगली. झालाबादचीं इतरहि कामें त्यानें आस्थापूर्वक पार पाडलीं; इतकेंच

काय, पण एक नवें शेत पाडण्याची श्रीधरकाकांकडून अनुज्ञा घेऊन त्यानें कामहि सुरू केलें. या शेतांत तो स्वतः कामकऱ्यांबरोबर खपे. विश्वनाथची ही आस्था आणि ओढ पाहून श्रीधरकाका–रमाकाकूंना अतिशय आनंद होई. भर दुपारीं शेतात काम करून आलेली विश्वनाथाची घामानें निथळणारी मूर्ति पाहिली कीं रमाकाकूंचें अंतःकरण संतोषाने भरून जाई आणि तशाच निथळणाऱ्या अंगानें त्यानें, धांवत धावत येऊन अंगाला बिलगलेल्या शेखरला उचलून घेऊन खांद्यावर बसविलें म्हणजे आपल्या दृष्टींत कोणीतरी अमृत ओततें आहे असे त्यांना वाटे. त्या तशाच त्या दृश्याकडे टक लावून पाहत रहात, पण लगेच हें असें अक्षय टिकेल का अशी शंका त्यांच्या मनांत शिरे आणि त्यांचें हृदय भीतीनें थरकूं लागे. त्या शंकेनें त्या विव्हळ होत, पण ही अमंगळ शंका श्रीधरकाकांकडे बोलून दाखविण्याचें धैर्य मात्र त्यांना कधीं झालें नाही. त्यांची ती शंकाहि त्या दृश्याच्या स्मृतींनें वितळूं लागे आणि त्यांचें अंतःकरण नितळ समाधानानें भरून जाई.

रजा संपल्यावर विश्वनाथ मुंबईला निघून गेला, पण या स्मृति मागें राहिल्या.

या स्मृतींच्या समाधानांत सहा महिने गेले. इतक्यांत—

× × ×

गांवांतल्या एका गोष्टीवेल्हाळ म्हाताऱ्यानें त्यांना एक बातमी सांगितली. त्याचा एक मुलगा मुंबईला होता. त्याच्याकडून आलेल्या ताज्या पत्रांत, त्याच्या चाळींतून जावईबापूंना एक मुलगी सांगून गेली आहे असा मजकूर होता. ती बातमी ऐकतांच रमाकाकूचें डोकें सुन्न झालें. तो म्हातारा आणखी बरेंच कांहींतरी सांगत होता, पण त्याना त्याचा बोध झाला नाहीं. त्यांच्या डोळयांत पाणी उभें राहिलें. त्यांनी चटकन् तोंड फिरविले आणि त्या आंत आल्या—

—आंत आल्या आणि त्यांनीं अश्रूंना वाट करून दिली.

जांवईबापू पुन्हा लग्न करणार!– हा विचारच त्याना सहन होईना. हें कसें शक्य आहे? त्या म्हाताऱ्याच्या मुलाने कांहींतरीच लिहिलें असेल. पण त्याला तरी असें खोटें लिहिण्याचें काय कारण? त्यांचें मन भीति

आणि शंका यांनीं भरून गेलें. त्यांना पुनः पुन्हा तें रजेंतलें दृश्य आठवूं लागलें. शेखरला घेतलेली ती विश्वनाथची मूर्ति त्यांच्या नजरेसमोर उभी राहिली. छट्—यांत कांहींतरी घोटाळा असला पाहिजे. हें खरें नाही. कोणी तरी तिऱ्हाईत बाईनें यावें आणि शेखरला विश्वनाथकडून हिसकून घेऊन दूर फेकून द्याव—ही कल्पना किती भयंकर! त्यांचें मन तिच्यावर विश्वास ठेव यला तयारच होईना. पण ती पुनःपुन्हा वाढत्या वेगानें त्यांच्या मनात उसळूं लागली—आणि त्यांच्या जिवाची सारखी तडफड सुरू झाली.

श्रीधरकाका बाहेरून आल्याबरोबर त्यांच्या कानांवर रमाकाकूंनीं ही बातमी घातली ती ऐकल्याबरोबर श्रीधरकाकांचा चेहरा खाऊन् उतरला. पण त्यांनीं स्वतःला सावरलें आणि थोडें हास्य आणून ते म्हणाले,

" अग त्यांचं वयच आहे. आपल्याला पसंत नाहीं म्हणून जन्मभर का ते लग्नाशिवाय राहाणार आहेत ! तशी अपेक्षाच करणें वेडेपणाच नाहीं का? आज ना उद्यां ते लग्न करणारच. उगीच आपली वेडी आशा धरून बसण्यांत काय अर्थ आहे ! आणि गरज तरी काय ! आपल्याला आपला शेखर नाही आहे का ! "

इतकें बोलून ते गप्प बसले. त्यांच्या डोक्यांत कांहीतरी जोराचा विचार चाललेला त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता. थोडा वेळ तसेच गप्प राहून ते म्हणाले,

" अग, रोहणी शेखरला मागं टाकून गेली यांत ईश्वराचाच कांहीं हेतु असेल. पहिल्यापासून तुला मुलगा हवा होता. रोहिणीनें हा आपल्याला मुलगाच दिला असं समज. जांवईबापू मुलाप्रमाणें वागले म्हणून ते का मुलगा होणार आहेत ! रोहिणीमुळें त्यांचा आपला संबंध रोहिणी गेली—आतां तेहि एक दिवस— किती दिवस धरून ठेवूं त्यांना आपण ! आतां शेखरच आपला मुलग !... "

अस ते किती तरी वेळ बोलत बसले. रमाकाकूहि कांहीं न बोलतां विचारी मनानें ऐकत राहिल्या. श्रीधरकाकांच्या आवाजांत वस्तुस्थितीची

प्रखर जाणीव होती. तिनें त्यांचा आवाज शुष्क बनला होता. त्या शुष्क-पणानें रमाकाकूंच्या मनावर बराच परिणाम केला.

" आतां शेखरच आपला मुलगा " हे श्रीधरकाकांचे उद्गार त्यांच्या मनांत घोळत राहिले. शेखरला आपला मुलगा म्हणून वाढविण्याची कल्पना, एकादें फुलपांखरूं फुलासभोंवतीं नाचत बागडत त्याला पुनः पुनः शिवत राहतें तशी त्यांच्या मनाला स्पर्श करीत राहिली. त्यांच्या मनांत एक नवेंच चैतन्य शिरलें. तें तरल बनलें. रोहिणीच्या बालपणींच्य आठवणी त्यांच्या मनांत जमा होऊं लागल्या. केव्हां केव्हां लहानग्या रोहिणीला मुलाचा पोशाख चढवून त्या तिच्याकडे टक लावून पाहत बसत, त्याची त्यांना आठवण झाली. त्या वेळचा त्यांचा उत्साह जागृत झाला. दुपारी जेवणानंतर त्या झोंपल्या नाहींत. खोलीतलें एक कपाट उघडून वस्तूंची उगीच चाळवाचाळव करीत राहिल्या. त्यांत रोहिणीचे लहान-पणापासूनचे कपडे, लहानपणचे खेळ, पुस्तकें वगैरे अनेक वस्तु होत्या. या वस्तू पाहून त्यांना आज एक निराळेंच समाधान होत होतें. श्रीधरकाका वामकुक्षीनंतर उठले तेव्हां त्यांना रमाकाकू या जुन्या वस्तु भारावलेल्या नजरेनें पाहत असलेल्या दिसल्या. त्या दृश्यानं त्यांचेंहि चित्त तरल झालें. रोज वामकुक्षीनंतर ते भागवताची पोथी घेऊन बसत—आज तें कर्जखतावणीच्या वह्या काढून जुने हिशेब उलगडत बसले संध्याकाळ झाली तेव्हां, शेखरला घेऊन यंदा पाडलेल्या नव्या शेताकडे फिरायला जाऊं या असें त्यांनी सुचविलें. रमाकाकूहि लगेच तयार झाल्या. नव्या शेतांत गेल्यावर त्यांत पीक किती येईल याची त्यांनीं विचारणा केली आणि त्याच्या उघड्या बांधावर चारदोन आंबे-फणसाचीं झाडें लावावीं का याबद्दल श्रीधरकाकांशीं चर्चा केली. ही चर्चा करतांकरतांच, हीं झाडं मोठीं होऊन फळें धरतील तोंवर आपण जगूं तरी का असा एक विचार त्यांच्या मनांत आला, पण तो फार वेळ थरला नाहीं. तीं झाडें मोठीं झालीं म्हणजे आज अगदीं उघडेंबोडकें दिसणारें हें शेत किती शोभून दिसेल याचेच विचार त्यांच्या मनांत संचरत होते. रात्रीं भोजनोत्तर श्रीधरकाकांनीं रोजच्या

प्रमाणें थोडेसें भजन केलें—पण त्याच्याकडे रमाकाकूंचें फारसें लक्ष नव्हतें तें पुन:पुन्हां त्या शेताकडे धांवत होतें.

झोपेंत त्या शेताचीं स्वप्नें पडूं लागलीं. हळूहळू त्या स्वप्नांत त्यांची सारी शेतवाडी रंगूं लागली. इतक्यांत उजाडण्याच्या सुमारास त्या एका स्वप्नांतून दचकून उठल्या. त्यांचा चेहरा खूप घाबरला होता. अंगाला कंप सुटला होता. त्या जाग्या झाल्या, पण आजुबाजूचा बोध त्यांना होत नव्हता. त्यांच्या भयग्रस्त मनापुढें एका स्वप्नाची भयानक आठवण नाचत होती: आपल्या घरापुढचेंच जांवईबापूंनीं तीन-चार वर्षांपूर्वी लावलेलं आंब्याचें कलम. तीन वर्षांचा शेखर त्याच्यावर चढला होता आणि, ‘मी बघ कुथं चललों’ ‘मी बघ कुथं चललों’, असें तोंडानें ओरडत तो कलमची फांदी धरून हंसत खिदळत हालवीत होता. इतक्यांत आपण पाणघरांतून पाण्याची घागर आणली आणि त्या झाडाच्या बुधात ओतली. त्याबरोबर तें कलम भराभर वाढूं लागलें. वाढतां वाढतां त्याचा मोठा अवाढव्य वृक्ष झाला शेखर कुठें तरी वर उंच झाडाच्या शेंड्यांत गेला. पाहतां पाहता त्या वृक्षाच्या फांद्या जीर्ण झाल्या. पानें भराभर पिकली आणि गळून पडूं लागली. शेखर चढला होता ती फांदी तर मुळांतच पोखरलेली दिसली. पाहता पाहतां ती कडाड् मोडली— आणि शेखरसकट ती खालीं......

ती खाली येऊन आदळणार तोंच रमाकाकू दचकून जाग्या झाल्या. बराच वेळ उठून बसण्याची शक्ति त्यांना नव्हती. त्यानी तशीच आपली भयचकित दृष्टि शेजारीं झोपलेल्या शेखरकडे टाकली. तें बाळ सुखानें झोपलें होतें. त्या कांपऱ्या पावलानें अडखळत उठल्या आणि त्यांनीं जाऊन श्रीधरकाकांना उठविलें; आणि आपलें स्वप्न त्यांना सांगितलें.

तें ऐकतां क्षणींच श्रीधरकाकांचा चेहरा विचारांनीं भरून गेला. खरोखर आपण आतां म्हातारे झालों आपल्यांत आतां कांहीं जोम उरलेला नाही. शेखरला—लहानग्या शेखरला—रोहिणीच्या ठिकाणीं कल्पून वाढविणें म्हणजे आपला गेलेला जन्म पुन: जगणेंच होय. खरोखर किती कठीण आहे हें! एकादा जुनाट वृक्ष एका ठिकाणाहून उमळून नेऊन दुसरीकडे

थोडाच लावतां येतो ? छट् ! तें शक्य नाहीं. श्रीधरकाका एकदम चिंताक्रांत झाले. निराश स्वगत ते म्हणाले,

" बरोबर आहे. शेखरला वाढविण्याचं आपलं वय का उरलं आहे ?"

रमाकाकूंनीं एक जोराचा उसासा टाकला. त्याचें मन विलक्षण निराश झालें. पण त्यांना श्रीधरकाकांचें म्हणणें पटलें. कांहीं दिवसांपूर्वींचा शेखरच्या वाढदिवसाचा प्रसंग त्यांना आठवला. दर अक्षय तृतीयेला रोहिणीचा वाढदिवस आपण किती समारंभानें साजरा करीत असूं ! आठ आठ दिवस त्याची तयारी चालत असे. पण शेखरचा ? त्याचें आपल्याला स्मरणसुद्धा नव्हतें. कोजागिरीच्या आदल्या दिवशीं गांवचा गुरव देवळां-तल्या जागरणाचें आमंत्रण घेऊन आला तेव्हां आज शेखरचा वाढदिवस आहे याची आपल्याला आठवण झाली.

श्रीधरकाकांचें म्हणणें त्यांना पटलें. पण त्यांची वृत्ति विलक्षण विकल झाली.

—इतक्यांत पोष्टमननें एक पत्र आणून दिलें तें विश्वनाथाचें होतें. एक मुलगी सांगून आली होती, पण आपण ती नाकारली, असा त्यांत मजकूर होता.

आकाश पुनः नक्षत्रांनीं मोहरलें.

* * *

असे पांचसहा महिने गेले. यंदा येतांना शेखरकरितां कांहीं वस्तु घेऊन येण्यासाठीं रमाकाकूंनी विश्वनाथला लिहिलें. पण यंदा आपल्याला रजा मिळण्याचा फारसा संभव नाहीं असें त्याचें उत्तर आलें. रमाकाकूंना फार आश्चर्य वाटलें. रजेविषयीं तक्रार विश्वनाथनें आजवर केली नव्हती.

" काय बाई तरी " रमाकाकू श्रीधरकाकांना म्हणाल्या, " यंदांच कशी यांना रजा मिळत नाहीं ! "

" अग आपल्याला काय माहीत ? लढाईचे दिवस. नसेल मिळत रजा. " श्रीधरकाका हें म्हणाले खरे, पण त्यांचें त्यांनाच समाधान होत नव्हतें.

एकादा रोग बरा झाला आहे अशा समजुतीने वागत असावें, पण तो

बरोबर बरा झालेला नाहीं अशी जाणीव मात्र कुठें तरी खुपत असावी — तेंव्हा त्यांचें जीवन सुरू झालें.

आणि एक दिवस ती सल सलली—

इंदूरला रमाकाकूंच्या नात्यांतले एक गृहस्थ रहात असत. त्यांचें पत्र आलें. इतर अवांतर मजकुराबरोबर जांवईबापू इंदूरला मुलगी पाहायला येऊन गेल्याचें त्यांनीं लिहिलें होतें.

रमाकाकूंच्या अंतःकरणावर एकदम आघात झाला. त्यांना चीड आली. संतापानें त्या म्हणाल्या,

"इकडे यायला रजा मिळत नाहीं, अन् इंदूरला जायला मिळते वाटतं !"

"अग हें चालायचंच. पोटच्या पोराची माया पातळ होते, तेथें जांवयाचं काय !"

श्रीधरकाकांनी रमाकाकूंच्या पेक्षां आपल्याच मनाचें समाधान करण्याचा प्रयत्न केला.

"पण मुलासाठी तरी !—तो सारखा त्यांची आठवण काढीत असतो. त्याला तरी पाहीन असं वाटावं कीं नाहीं !"

"अग तरुण वय आहे—या वयांत मुलापेक्षां बायकोचीच ओढ अधिक असते. आपण कितीहि धरून ठेवलं म्हणून ते जन्मभर का लग्नाशिवाय राहाणार आहेत !"

मुलगी पसंत पडली नाहीं असें त्या पत्रांतच होतें. पण श्रीधरकाकांचे हे— 'जन्मभर ते लग्नाशिवाय का राहणार आहेत' हे— उद्गार पावसाळ्यांतलें वारें परसवांतल्या झाडांत घुमत राहतें तसे त्यांच्या मनांत घुमत राहिले.

मग एक दिवस लग्न करणारच ते — दुसऱ्या कोणाचे तरी जांवई होणार ! त्यांच्या मनांतलें वारें आणखी जोरानें घुमूं लागलें !

—एकदम त्यांच्या मनांत विचार आला. आपल्याला रोहिणीसारखीच आणखी एक मुलगी असती तर ! आपण तिला विश्वनाथलाच देऊं केली असती !

—त्यांना आणखी एक मुलगी असती तर त्यांचें मन असें पिळवटूंच लागलें नसतें. पण एवढें जाणण्याइतकें त्याचें मन भानावर नव्हतें. पुराच्या पाण्याला आपल्यांत मिसळलेली माती आणि आपला गढूळ रंग यांचा संबंध थोडाच समजत असतो ?—

बराच वेळ त्या या विचारांशींच खेळत राहिल्या, तोंच आणखी एक विचार सुचला. आपण एकादी मुलगी दत्तक घेतली तर ? दत्तक घ्यावी आणि विश्वनाथलाच द्यावी.

पण मुलगी दत्तक ?—त्यांच्या त्याच दचकल्या.—लोक हंसतील नाहीं का ? मग मुलगाच का दत्तक —

ही कल्पना त्यांच्या मनांत डोकावली मात्र—एकदम कोणी तरी डसावें तशी शेखरची आठवण त्यांना झाली. शेखर !—रोहिणीने मागें ठेवलेला ठेवा ! आपलें जें कांहीं आहे तें सारें त्याचेंच नाहीं का ? एकदम त्यांची नजर आपल्या शेतीवाडीवरून, गुरावासरांवरून झर्कन फिरली—दत्तक येणार तो यांच्यावर नजर ठेवून येणार ! —शेखरच्या तोंडचा घांस काढून घ्यायला येणार ! अग बाई !

—एकदम त्यांना विलक्षण अपराधी वाटूं लागलें.

शेखर ! पण शेखर किती लहान आहे ! कोण संभाळ करणार त्याचा ? कोण करणार शिक्षण त्याचें ? जावईबापू ? ते लग्न करणार नि त्यांचें सारें चित्त बायकोंत जाऊन बसणार ! मग कोण करणार हें सारें ? कोण ?

आपण ?—आपण आतां पिकलीं पानें ! केव्हां तरी गळणार !

एकदम त्यांना सकाळचें स्वप्न आठवलें आणि त्यांचें अंतःकरण व्याकुळलें. त्यांना कांहीं सुचनासें झालें. बधीर मनासमोर धुकेंच धुकें पसरलें.

त्या बधीर अवस्थेत बराच वेळ राहिल्यावर त्यांचें मन निवळूं लागलें, आणि धुकें वितळूं लागल्यावर सृष्टीचें रंगरूप स्पष्ट होऊं लागतें व आपली नजर अखेरीस कोणत्या तरी एका दृश्यावर स्थिरावते तसें त्यांचें मन एका विचारावर स्थिर होऊं लागलें. एकदम त्याचा त्यांना बोध झाला. विश्वनाथला द्यायला आपल्याला आतां मुलगी नाहीं, पण

आपल्याशीं मुलीप्रमाणेंच वागेल अशा एकाद्या मुलीशी त्यांचें लग्न नाहीं करून देतां येणार ?

हा विचार मनांत आल्याबरोबर त्यांचा चेहरा खुलला. पाणघराच्या पायरीवर त्या बसल्या होत्या, तेथून सटकन् उठल्या आणि ओटीकडे धांवल्या. ओटीच्या दारांत गेल्याबरोबरच त्या श्रीधरकाकांना म्हणाल्या,

" ऐकलं का ? "

" काय ? "

" माझ्या मनांत एक गोष्ट आली आहे– आपणच जांवईबापूंचं लग्न करून दिलं तर ? "

" म्हणजे ? मी नाहीं समजलों ! "

" आपल्याशीं मुलीप्रमाणें वागणारी एकादी मुलगी आपण त्यांना करून दिली तर ? "

रमाकाकूंची ही कल्पना ऐकून श्रीधरकाका चकित झाले. असें झालें तर जांवईबापूंचे व आपले संबंध कायम राहतील हें त्यांच्या ध्यानांत आले. पण हें जमावें कसें ?

" हं–तें खरं–" श्रीधरकाका विचार करीत म्हणाले, " पण अशी मुलगी कोण शोधून काढणार ? "

" माझ्याजवळ आहे अशी मुलगी. आपल्या दिगंबरपंतांची बिंदू– "

" होय, ती आहे—"

" आपण सांगावं दिगंबरपंतांना कीं, तुमच्या मुलीला इथें द्या म्हणून. बिचारा असं सुंदर स्थळ मिळाल्याबद्दल जन्मभर उपकार विसरणार नाहीं. अन् बिंदू देखील. आपल्यामुळें हें स्थळ मिळालं म्हणून आपुलकीनें वागेल आपल्याशीं ती—"

श्रीधरकाकांना ही कल्पना पटली. दिगंबरपंत हे श्रीधरकाकांच्या कुळांपैकी एक होते. त्यांच्या चंद्रमौळी संसाराला ठिगळें लावायला श्रीधरकाका अनेकदां पुढें सरसावले होते–आणि तो बिचारा निष्कांचन ब्राह्मण या उपकारांखालीं दबून गेला होता. त्यांची बिंदू रूपानें चांगली ठसठशीत होती, पण बापाचें दारिद्र्य तिच्या लग्नाच्या आड येत होतें.

हुंडयाच्या अभावीं तिच्या रूपाची कदर होत नव्हती. श्रीधरकाकांनीं कोणतेही स्थळ सुचविलें असतें तरी दिगंबरपंतांनीं त्यांचे महदुपकार मानले असते, पण श्रीधरकाकांनीं विश्वनाथचें स्थळ सुचविलें तेव्हां त्यांचा आपल्या कानांवर विश्वासच बसेना. हो, चवळीचा वेल कितीहि वाढला तरी पानवेलाप्रमाणें तो झाडच्या शेंडयाला थोडाच पोंचणार ! ते श्रीधरकाकांच्या चेहऱ्याकडे बावरलेल्या नजरेनें पाहूं लागले. तेव्हां श्रीधरकाका म्हणाले,

" अहो, खरंच म्हणतोय् मी. जांवईबापूंना जर लग्नच करायचं—हो म्हणजे, त्यां ी लग्न करणेंच बरं अहो, जन्मभर ते लग्नाशिवाय का रहाणार आहेत ? तरुण वय आहे त्यांचं. तेव्हा म्हटलं, लग्नच करायचं तर इकडचीच कोणी तरी, आमच्या परिचयाची मुलगी असलेली बरी नाहीं का ? इकडे एवढा पसारा आहे— तिकडे नको का कोणी पाह्यला ? आमचं काय, आम्ही आज आहोंत नि उद्यां नाहीं. तेव्हां इकडचीच कोणी मुलगी केली तर साहजिकच इकडे लक्ष राहील त्यांचं नाहींतर तिकडची इंदूर–नागपूरकडची कोणी केली तर ते इकडचं सारं विकूनटिकूनच टाकणार ना ? कसं बरं सहन होईल तें आम्हांला !—म्हटलं, इकडचीच कोणी तरी पाहावी—नि मग तुमची बिंदू आठवली. "

श्रीधरकाका थोडे थांबले. नंतर म्हणाले,

" किती झालं तरी तुमची बिंदू आमच्या माहितींतली—आम्ही लहानपणापासून बघतों आहोंत तिला. ती आमच्या घरांत आली तर शेखरला आई मिळेल आणि आम्हांला—" श्रीधरकाकांचा गळा दाटून आला— " आम्हांलाहि आमची रोहिणी परत मिळाल्यासारखं होईल. " एवढं ते म्हणाले आणि त्यांनीं डोळ्यांना उपरणें लावलें. दिगंबरपंतांना काय बोलावें हेंच सुचेना. ते गुदमरलेल्या वृत्तीनें तसेच बसून राहिले. अखेरीस बऱ्याच वेळानें ते म्हणाले,

" फार उपकार होतील तुमचे, हें जमलं तर. "

" अहो उपकार कसले त्यांत ? आम्हांलाहि तेंच हवं आहे. पाहूं या जांवईबापूंचा काय विचार पडतो तो. आजच लिहितों त्यांना. "

श्रीधरकाकांनीं लगेच विश्वनाथला पत्र लिहिलें. मुलगी पाहायला येतों असें त्याचें उत्तर आलें. पांचसहा दिवसांत तो आलाच. काय, यंदा रजा मिळणार नव्हती ना ? ' असें थोडेंच खवचट स्वागत रमाकाकूंनी केलें, पण आपण ठरवून दिलेल्या मुलीशीं त्यांचें लग्न करून देण्याच्या आनंदांत त्यांनीं त्याला अधिक हिणविलें नाहीं.

विश्वनाथनें बिंदूला पाहिलं मात्र, ढगाआडचा सूर्य बाहेर यावा आणि आकाशांत एकदम तेज फांकावें तसेंच वाटलें त्याला. त्यानें तिला पसंत केलें. लग्न उरकूनच मुंबईला जावें असें ठरलें. त्यानें रजा वाढवून घेतली. लग्नसमारंभ दिगंबरपंतांच्या, दहाबारा मैल दूर असलेल्या, गावीं व्हायचं ठरलें. तिकडे जायला निघतांना रमाकाकूंनीं विश्वनाथला देवघरांत बोलावलें, त्याच्याकडून देवापुढें नारळ ठेवविला आणि हातावर दहीं घातलें. हें झाल्यावर तो उठला आणि त्यानें नमस्कार करण्यासाठीं रमाकाकूंच्या पायावर मस्तक ठेवलें. तोंच त्याला रडें कोसळलें आणि तो स्फुंदून स्फुंदून रडूं लागला. रमाकाकूंच्या तोंडून हुंदका बाहेर पडला, पण त्यांनी स्वत:ला आवरलें आणि त्या विश्वनाथला उठवीत रुद्ध आवाजात म्हणाल्या,

“ असं काय वेड्यासारखं ! अहो, नशिबांत असतं तसं होतं. तुम्ही मुळीसुद्धा खंत करू नका. जा–जा तुम्ही. तुम्हांला आमचा आशीर्वाद आहे. अहो, ही बिंदू आम्हांला का कोणी परकी आहे ? जशी रोहिणी तशीच ती. तुम्हीं एवढं मानलंत अन् हें घर पूर्वीसारखंच आपलं म्हटलंत म्हणजे आम्हांला दुसरं कांही नको. ”

शेखर दूर उभा राहून बावरलेल्या जीवानें हें सारें पाहत होता. विश्वनाथनें रुमालानें डोळे पुसले आणि त्याच्याकडे जाऊन त्याला उचलून घेतलें.

रमाकाकूंना गतवर्षीच्या रजेंतलें तें दृश्य आठवलें. त्यांचे डोळे आनंदानें भरून आले. अश्रूंमुळें समोरचें दृश्य अंधुक झालें. इतक्यांत विश्वनाथ शेखरला घेऊन बाहेर गाडींत बसायला गेला.

विश्वनाथ बिंदूला घेऊन आला तेंव्हा बिंदूची बिंबा झाली होती. ' इश्श ! कधीं नव्हतं बा ऐकलं असलं नांव ' या उद्गारांनीं रमाकाकूंनी या नामां-

तराचें स्वागत केलें. पण तें नांव त्यांच्या मनाला याहूनहि अधिक लागलें होतें. बिंदु हें नांव सासुरवासिनीस शोभणारें नाहीं, तें बदललें पाहिजे, हें त्या जाणत होत्या; पण हा नांव बदलण्याचा विधि आपल्याकडे होईल अशी आशा त्यांना वाटत होती. त्यांनीं मनातल्या मनांत एकदोन नांवेंहि योजून ठेवली होतीं. रोहिणीच्या नामकरणाच्या वेळचा प्रसंग त्यांना सारखा आठवत होता. त्या वेळीं ' नांव काय ठेवूं ? ' म्हणून जांवईबापूंनीं आपल्यालाच विचारलें होतें, अन् ' तुम्हांला वाटेल तेंच ठेवा ' असें आपण सांगितलें तेव्हां त्यांनीं रोहिणी हेंच नांव ठेवलें होतें. नांव बदललें नाहीं याचें आपल्याला तेव्हां किती नवल वाटलें, पण अलीकडे पुष्कळ लोक नांवें बदलत नाहींत असें ऐकलें तेव्हां जरा बरें वाटलें. बिंदूचें नांव बदलायलाच हवें होतें, पण पूर्वीप्रमाणें ' नांव काय ठेवूं ? ' म्हणून विश्वनाथ आपल्याला विचारील अशी त्यांना खात्री वाटत होती पण तो जेव्हां बायकोचें नाव बदलूनच परत आला तेव्हा त्यांच्या जिव्हारावर घावच बसला. बिंबाला कटाक्षानें बिंदू म्हणून त्यांनीं आपला रोष व्यक्त कला, पण त्यांचें तिला बिंदू म्हणणं इतकें स्वाभाविक होतें कीं, विश्वनाथला अगर इतर कोणाला हि त्यांत फारसें वावगें वाटलें नाहीं. पण त्या थोडया आंखडत्या वृत्तीनें वागत आहेत हें मात्र विश्वनाथच्या लक्षात आल्याखेरीज राहिलें नाहीं.

विश्वनाथ सुद्धां एका चमत्कारिक अलिप्त वृत्तीनेंच वागत होता. तो आठ दिवस राहिला, पण तेवढ्या अवधींत तो मन मोकळें करून असा कोणाशीं बोललाच नाहीं. बिम्बा मधूनमधून त्याच्याकडे आतुर अपेक्षेच्या दृष्टीनें पाहात असे, पण त्या वेळीं चेहऱ्यावर थोडेंसें हसूं आणून स्तब्ध नजरेनें पाहाण्यापलीकडे विश्वनाथनें तिला अधिक प्रत्युत्तर दिलें नाहीं. शेखर त्याच्या भोंवतीं भोंवतीं असे, तो त्याला घेईसवरी, पण त्यांत फारसा जीव नव्हता हें त्याचें त्याला व त्या अज्ञ बालकालाहि जाणवत असे. त्या आठ दिवसांत तो थोडासा निर्बोध वृत्तीनेंच वागत होता.

मुंबईला जातांना तो बिंदूला रमाकाकूंकडेच ठेवून गेला. कदाचित्

तिला बरोबर घेऊनच तो जाईल अशी शंका त्यांच्या मनांत तरळत होती. ती दूर झाल्यामुळें त्यांना बरें वाटलें.

मुंबईला गेल्यावर विश्वनाथाचीं पत्रें नियमित येऊं लागलीं. तीं नेहमीं श्रीधरकाकांच्या नांवानें येत. त्यांत 'बिंबाला आशीर्वाद' याहून तिचा अधिक परामर्श फारसा कधीं नसे. यामुळें रमाकाकूंना थोडेसें गुप्त समाधानच होई. पुढें श्रावणांत शेवटच्या मंगळवारला बिंदू माहेरला गेली तेव्हां तिकडे तिला विश्वनाथचें पत्र आलें होतें असें त्यांना समजलें तेव्हां त्यांना चमत्कारिक वाटलें; पण त्यांनीं कोणाला तसें बोलून दाखविलें नाहीं. आणि बिंदू परत आल्यावर विश्वनाथचीं पत्रें जेव्हां श्रीधरकाकांच्या नांवानेच येऊं लागलीं तेव्हां ती गोष्ट त्या बहुतेक विसरूनहि गेल्या. पण दसरा झाल्यावर विश्वनाथचें बिम्बाच्या नांवचें एक पत्र जेव्हां आलें तेव्हां त्यांना फार आश्चर्य वाटलें. ती गोष्ट त्यांना लागली व त्यांनीं आपलें वैषम्य श्रीधरकाकांपाशीं बोलून दाखविलें. दिगंबरपंतांनीं त्यांना दिवाळसणाला बोलावलें आहे त्याबद्दल लिहायचें असल्यानें पाठविलें असेल बिंदूला पत्र त्यांनीं, असें श्रीधरकाकांनी त्यांचें समाधान करण्याचा प्रयत्न केला, पण रमाकाकूंचें मन साफ झालें कीं नाहीं हें त्यांचें त्यांनाच समजलें नाहीं.

दिवाळीच्या चार दिवस अगोदर विश्वनाथ आला. बिंदूच्या माहेरच्या मंडळीला बोलावून दिवाळसण आपल्याकडेच करावा असें रमाकाकूंचें म्हणणें होतें. दिवाळसण दिगंबरपंतांकडेच होणें रास्त हें श्रीधरकाकांचें म्हणणें त्यांना पटत होतें, पण विश्वनाथला दुसरी सासुरवाडी आहे ही कल्पना त्यांच्या मनाला सहन होत नव्हती. अखेरीस दिवाळसण आपल्याकडे झाला तर लोक नांवें ठेवतील असें श्रीधरकाकांनीं जेव्हां निक्षून सांगितलें तेव्हां त्या कबूल झाल्या. पण विश्वनाथवर दुसऱ्या सासुरवाडीचा अधिक हक्क सुरू झाला ही टोचणी कांहीं बंद होईना. अखेर त्यांच्या व्यथेला निराळाच तोंड फुटलं. त्या श्रीधरकाकांना म्हणाल्या,

"दिवाळसण तिकडेच व्हायला हवा तर होईल मेला! पण इकडेच करा म्हणून जांवईबापूंनीं नको होता का आग्रह धरायला! पण ते तर तोंडावाटें अवाक्षर काढायला तयार नाहींत!"

" अग किती झालं तरी त्यांची जांवयाची भूमिका " श्रीधरकाका म्हणाले, " त्यांना कसं कांहीं म्हणता येईल ! "

" पण मग हीच आपली सासुरवाडी असं त्यांनी मोठं अश्रू ढाळीत सांगितलं होतं तें ! "

" अग होय, पण व्यवहारांत प्रत्येक शब्द नाण्याप्रमाणं वाजवून घेतां येतो वाटतं ! "

रमाकाकूंचें समाधान झालें नाहीं. शेखरला विश्वनाथबरोबर पाठवायचें नाकारून त्यांनीं आपला राग उगवून घेतला. विश्वनाथनेंहि फार आग्रह धरला नाहीं. पण ह्याचा त्यांना आणखी राग आला. विश्वनाथ बिंबाला घेऊन सासुरवाडीस जाण्यासाठीं बाहेर पडल्याबरोबर त्या शेखरला घेऊन खोलींत गेल्या आणि बराच वेळ त्याला पोटाशीं धरून अश्रू ढाळीत पडून राहिल्या.

विश्वनाथ दिवाळसणाहून बिम्बासह आठ दिवसांनीं आला, तेव्हां रमाकाकूंना तिच्या कानांत नव्या कुड्या झळकतांना दिसल्या. या कुठून आल्या ? दिगंबरपंतांनीं दिल्या ? पण छे ! त्यांची कोठली एवढी ऐपत ? जांवईबापूंच्या हातांतहि कांहीं आंगठी दिसत नाहीं. उपरण्यापागोट्यावरच बोळवण झालेली दिसते ! मग कुड्या कुठल्या ? नाना तर्क रमाकाकूंच्या मनांत आले, पण त्यांनी संयम केला. बिंदूला कांही विचारलें नाहीं. एकंदरींत बोलणें कमीच झालें. तोंच दुपारी बिम्बानें, रोहिणीचे दागिने दिवाळसणास जातांना तिला घालायला दिले होते ते रमाकाकूंपाशीं काढून दिले, तेव्हां मात्र त्यांना राहवेना. त्यांनी कुड्यांबद्दल विचारलें. मुंबईहून येतांना आणल्या, असें तिनें सांगितलें मात्र, त्यांची चर्या एकदम बदलली. त्या कुड्या आपल्याला डसायला येताहेतसें त्यांना वाटलें. ' अस्सं ! ' एवढा एक खंवट उद्गार काढण्यापलीकडे त्या कांहीं बोलल्या नाहींत. पण त्या तडक श्रीधरकाकांच्या खोलींत गेल्या, आणि श्रीधरकाकांना कुड्यांची हकीकत सांगून संतापाच्या स्वरांत म्हणाल्या,

" चार वर्षांत रोहिणीच्या अंगावर एक दागिना घातला नाहीं यांनी नि त्या चिमुरडीला—"

" अग पण रोहिणीला त्यांनीं दागिने करण्याची गरज काय होती ? आपण नव्हते का तिला सारे दागिने दिले ? "

" अन् या बिंदूला होती वाटतं गरज ? मी माझ्या हातांनीं रोहणीचे दागिने चढविले तिच्या अंगा—"

पण रमाकाकूंचें वाक्य पुरें झालें नाहीं. त्या एकदम डोळयांना पदर लावून रडूं लागल्या. रडतां रडतां हुंदके देत त्या कांहीं तरी बोलत होत्या, पण श्रीधरकाकांचें तिकडे लक्ष नव्हतें. हीं कुड्याची हकीगत ऐकून त्यांनासुद्धां चमत्कारिक झालें होतें. त्याचें मन विचारांत व्यग्र झालें. जांवईबापूंचा आपण जुळवून दिलेला हा नवा संबंध, मधली ती पत्राची भानगड, आतांचा हा कुड्यांचा प्रश्न, शेखरचें भवितव्य, अशा किती तरी गोष्टी, वावटळींत पाचोळा गिरक्या खातो तशा त्याच्या मनांत गर्कन् उलट सुलट फिरूं लागल्या. जरा वेळानें ते गंभीर स्वरांत म्हणाले,

" अग, रोहिणीची गोष्ट निराळी. जांवईबापूना बिंदूच्या आईवडिलांचा विचार करायला नको ? जांवयानं लेकीला दागदागिना केला म्हणजे तिच्यापेक्षां तिच्या आईबापांनाच अधिक आनंद होतो. मी म्हणतों, जांवईबापूंनीं बिंदूला कुड्या केल्या हेंच टीक केलें. आपण मात्र तिकडे सरळ मनानें पाहिलं पाहिजे. तढंच पाहिलं तर काय, सारं तढच दिसेल. "

एवढें म्हणून श्रीधरकाका गप्प बसले. श्रीधरकाकांच्या युक्तिवादाचा कीं त्यांच्या गंभीर स्वराचा परिणाम झाला हें नकळे, पण रमाकाकूंचेंहि रडें एकदम थांबलें. बराच वेळ कोणी बोललें नाहीं.

विश्वनाथ दोन दिवसांनी मुंबईला जायला निघाला. तेवढ्या अवधींत विशेष कांहीं झालें नाहीं, पण एक प्रकारची गंभीर उदासीनता मात्र त्या घरावर पसरली होती.

मुंबईला जाण्याच्या आदल्या दिवशीं श्रीधरकाकांनी, यंदां वैशाखांत त्या पिंपळाखालच्या मंदिराच्या जीर्णोद्धारासाठीं यायला चुकूं नका असें विश्वनाथला सांगितलें. त्यांच्या घरामागच्या ओढ्याला यंदां एक जबरदस्त पूर आला होता. कोणाच्या आठवणींत असा पूर आला नव्हता. त्या पुरानें पिंपळाच्या पायथ्याशीं बांधलेल्या त्या मंदिराची एक बाजू ढांसळली

होती आणि विष्णूची मूर्तीहि थोडीशी ढळली होती. यंदां या मंदिराचा जीर्णोद्धार करण्याचें त्यांनीं ठरविलें होतें. विश्वनाथनें यायचे कबूल केलें.

बिम्बा विश्वनाथाबरोबर जायला निघाली तेव्हां तिच्या अंगावर लग्नापासून असलेली रोहिणीची मोहनमाळ आणि बिल्वर होते. रमाकाकू त्याबद्दल कांहीं बोलल्या नाहींत आणि दोन दिवसांपूर्वी रोहिणीचे काढून घेतलेले दागिनेहि त्यांनीं बिम्बाला दिले नाहींत.

× × ×

विश्वनाथ मुंबईला गेल्यावर प्रथम प्रथम त्याचीं नेमानें पत्रें येत. तीं पूर्वीच्या मानानें जरा जुजबी असत आणि पुढें तींहि विरळ होऊं लागलीं. बिम्बाचीहि चंद्रशेखरच्या नांवानें दोन पत्रें आलीं, पण पुढें तीं अजिबात बंद पडलीं. विश्वनाथचें अलिकडे दीडदोन महिन्यांत मुळीच पत्र आलें नव्हतें. रमाकाकूंना तें जाणवलें, पण त्या फारशा बोलल्या नाहींत. अखेरीस एक दिवस श्रीधरकाकांना सपाटून ताप आला. ताप दोनच दिवस होता, पण त्यांत त्यांचा अगदीं शक्तिपात झाल्यासारखा झाला. तापांत श्रीधरकाकांना एकदोनदां भ्रम झाला आणि तेवढ्यांत त्यांनीं जांवईबापूंच्या पत्राची सातआठदां चवकशी केली. आतां मात्र रमाकाकूंच्या जिवाची तगमग होऊ लागली इतक्यांत आठदहा दिवसांनीं गांवांतला तो गोष्टीवेल्हाळ म्हातारा मुंबईस मुलाकडे जाऊन आल्याचें समजलें. तावडतोब त्यांनीं त्याला निरोप पाठवला. तो आल्याबरोबर त्यांनीं विचारलें,

“ काय हो, काय म्हणते मुंबई ? तुम्ही आमच्या जांवईबापूंकडे गेलाबिला होतात का ? ”

“ होय, गेलों होतों एकदां. ”

“ मग, तिकडची कांहीं हकीगत ? ”

“ हकीगत ?—आहे, ठीक आहे. ”

“ कां, अशीं अगदीं नाखुषीनं उत्तरं देता ? ”

“ नाहीं बा– नाखुषी कसली ? ”

तो असें म्हणाला खरा, पण त्याच्या मनांतून कांहीं तरी बोलायचें आहे हें त्याच्या चेहऱ्यावरून अगदीं स्पष्ट होतें. रमाकाकू त्याला म्हणाल्या,

" तुमच्या मनांतून कांहीं तरी बोलायचं आहे —मग बोला ना काय तें—"

" बोलूच म्हणता ? खरं सांगू वैनी, तुमची ही बिंदू पार बदलून गेली बरं— अगदीं मुंबईकरीण बनली ! "

बिंदूबद्दलचे हे उद्गार ऐकल्याबरोबर रमाकाकूंच्या चेहऱ्यावर रोष आणि विषाद यांच्या संमिश्र छाया उमटल्या. बिंदूबद्दल त्यांच्या मनांत निर्माण झालेली अढी पुन: चाळवली आणि ती अगदींच अनाठायीं नव्हती याचें थोडें समाधानहि तितक्यांतल्या तितक्यात त्यांच्या चेहऱ्यावर पसरलें. त्यांनीं थोडेंसें चांचरत पण अधीरतेनें विचारलें.

" म्ह—...म्हणजे काय, झालं तरी काय ? केलंन् तरी काय तिनं असं ? "

" अहो, मी तिच्याकडे तिला मुद्दाम भेटायला गेलों तर तिनं मला नुसतं यावसाहि म्हटलं नाहीं. मी गेलों तेव्हां तीं दोघं सिनिमा की कायसं म्हणतात ना त्याला जायला निघालीं होतीं. काय सांगू तिचा थाट तेव्हांचा !—नाकांत चमकी, वाटोळं नेसणें—तिच्या कपाळाच कुंकू आपल्याला तर बुवा दिसलच नाहीं—बाजारपेठेंत ती सदूवाण्याची सून आहे ना मुंबईकरीण ? बस्स ! तश्शी दिसत होती थेट ती ! "

रमाकाकूंच्या चेहऱ्यावर आतां फक्त रोषाची छटा उरली. त्या रागानें म्हणाल्या,

" अस्सें ! हा थाट करण्यांत जात असेल वेळ सारा, मग कशाला होईल फुरसत इकडे चिठीचपाटी पाठवायला ? बरं पण, जांवईबापू तरी कांही बोलले कीं नाहींत ? "

" छे हो ! त्यांना कुठं होती फुरसत मजकडे लक्ष द्यायला ? सारं लक्ष बायकोच्या जाम्यानिम्यांत गुतलं होतं. हें घाल नि तें नको घालू असं चाललं होतं सारखं त्यांचं. अखेरीस मीच त्यांना, कांहीं निरोप वगैरे आहे का विचारलं. तर म्हणे, निरोप वगैरे कांहीं नाहीं, ठीक आहे म्हणून सांगा.

एवढं ते म्हणाले अन् तीं दोघे खोलीच्या बाहेरहि पडलीं।"

"काय बाई माणसं तरी!"

"मी त्यांचा निरोप घेऊन चालूं लागलों, तेव्हां, पुन्हां या केव्हांतरी सवडीनं असें जांवईबापू म्हणाले, पण मीच गेलों नाहीं."

रमाकाकू यावर कांहीं बोलल्या नाहींत. त्या अधिक बोलूच शकत नव्हत्या. त्यांच्या जिवाचा संताप झाला. त्या मुकाट्यानें तेथून उठल्या नि आंत आल्या. पण त्यांना कांहींहि सुचेनासें झालें. श्रीधरकाका वैद्याकडे गेले होते, ते आल्याबरोबर त्यांनीं त्यांच्या कानीं ही सारी हकीगत घातली. ती ऐकल्याबरोबर श्रीधरकाका म्हणाले,

"या म्हाताऱ्याशीं ते बोलणार तरी काय असं?"

"म्हणून काय झाल? कांही निरोपबिरोप तरी द्यायला नको होता का? शेखरला कांही खाऊबिऊ?"

श्रीधरकाका यावर कांहीं बोलले नाहींत. ते निमुटपणें उपरण्याच्या शेवाने वारा घेत बसले.

× × ×

पाडव्याच्या सुमुहूर्तावर श्रीधरकाकांनी पिंपळाखालील मंदिराच्या दुरुस्तीस सुरवात केली. हें काम चालू असतांना रमाकाकू कधीं कधीं मागच्या पडवींत तें पाहत उभ्या राहत. त्या अशा पाहूं लागल्या कीं चार वर्षांपूर्वी विश्वनाथनें एका रजेंत पाणघर बांधलें तेव्हां सुतारांबरोबर काम करणारी—त्यांना रंधा मारण्यास मदत करणारी, ओळंबा धरणारी, पिंजरीवर बसून वांशावर रीप ठोकणारी त्याची मूर्ति आठवूं लागे आणि आतांच्या या कामांत कांही तरी चुकलेंय्, कांही तरी कमी आहे, अशी कसली तरी विचित्र जाणीव त्यांना होई. कधीं कधीं सुतारांकडून गाडी, मोटार वगैरे खेळ करून घेण्यासाठीं शेखर तेथें जाऊन त्यांच्याशीं लाडीगोडी लावीत असलेला त्यांना दिसे. शेखर असा दिसला कीं, त्यांचें मन एकदम तरल बने आणि तें कसले तरी चमत्कारिक झोके घेत आहे असें वाटे... आपल्या समोर छोटा शेखर सुतारांबरोबरीनें ओळंबा धरीत आहे, रंधा

मारीत आहे, पिंजरीवर बसून रीप ठोकीत आहे, असा अचानक भास त्यांना होऊं लागे–आणि मग, कां नकळे, त्यांच्या मनापुढची हीं चित्रें एकदम वेडींवाकडीं फिरू लागत, क्षणभर आपल्या समोर असंख्य भोंवरे फिरत आहेत असें वाटे आणि त्यांना एकदम त्या स्वप्नाची–त्या भयंकर स्वप्नाची–आठवण होऊन त्यांचें मन चूर होई !

—आणि मग जावयाबद्दल अलीकडे त्यांच्या मनांत निर्माण झालेली अढी कोठच्या कोठें वितळून जाई आणि त्यांचें अंतःकरण वात्सल्याच्या आर्त जाणिवेनें भरून येई.

त्यांना विश्वनाथला केव्हां पाहीन, भेटेन अशी इच्छा झाली. श्रीधर-काकांनीं त्याला मुद्दाम पत्र लिहून अक्षय्य तृतीयेस बिंदूसह येण्याचें आग्रहाचें बोलावणें केलें तेव्हां त्यांना खूप आनंद झाला. पांच सहा दिवसांनीं विश्वनाथचें उत्तर आलें. ‘ यंदा दिवाळींत रजा घेतल्यामुळें रजा मिळणें जरा कठिणच झालें आहे. तरीपण तिकडे येण्याचा बेत आहे. शक्य तर अक्षय्य तृतीयेसच येतों, पण निश्चित कांहीं सांगतां येत नाहीं ’ असें त्यानें लिहिलें होतें.

अक्षय्य तृतीया आली. मूर्तीच्या प्राणप्रतिष्ठेचा विधि सुरू झाला. मंत्रघोषानें मंदिर भरून गेलें. श्रीधरकाका आणि रमाकाकू कार्यांत भाग घेत होते, पण रमाकाकूंचें सारें चित्त जांवईबापूंच्या वाटेकडे लागलें होतें. दुपार उलटली तेव्हां त्यांनीं वाट पाहणें सोडून दिलें—पण आतां त्यांचें मन निराळ्याच विचारांनीं थरकूं लागलें. पावसाळ्यात मंदिर मोडलें आणि मूर्ति ढळली तेव्हां कांहीं अशुभ विचार रमाकाकूंच्या अगर कोणाच्याच मनांत आला नव्हता—रोहिणी गेल्यानंतर त्या मंदिराचें महात्म्यच कमी झालें होतें—पण आतां तो विचार त्यांचें चित्त जाळूं लागला. बिंदू आणि विश्वनाथ यांच्याबद्दल आपल्या मनांत निर्माण झालेल्या विकल्पाचा सारा इतिहास त्यांना आता आटवूं लागला. होय, ती मूर्ति ढळल्यानंतरच ती पत्राची भानगड उत्पन्न झाली आणि त्यानंतरच एकेक प्रकरण निर्माण होऊन आपलें मन विटाळत गेलें ! रोहिणी गेल्यावर त्या मूर्तीविषयींची मदावलेली त्यांची श्रद्धा एकदम तीव्रतेनें जागृत झाली. खरेंच, ती मूर्ति

ढळली—आजच्या प्रतिष्ठापनेनें तिचा कोप शांत होईल का? क्षणांत त्यांचें मन आशेनें पालव तर क्षणांत निराशेनें खुरटून जाई. क्षणांत एकदम भकास, शून्य वाटे, तर क्षणांत प्रसन्न वाटून त्यांच्यासमोर शेखर आणि विश्वनाथ यांच्या मूर्ती तरळू लागत. त्यांचे चित्त आतुर, उत्कंठित झालें. ब्राह्मण-सवाष्णी जेवून निघून गेल्याबरोबर त्या मंदिरांत गेल्या. समईच्या प्रकाशांत उजळलेली ती पुष्पगंधार्चित मूर्ति पाहून त्यांच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. कांहीं वेळ त्यांनी त्या मूर्तीला अश्रूंचा अभिषेकच केला आणि मग त्यांना मोकळें मोकळें वाटलें!

पंधरावीस दिवस लोटले. एक दिवस सायकाळीं श्रीधरकाका बाजारपेठेंतून आल्याबरोबर रमाकाकूंना म्हणाले,

" अग ऐकलं का? "

" काय? "

" जावईबापू आले आहेत म्हणे—"

" जांवईबापू आलेत! म्हणजे? "

" दिगंबरपंताकडे आलेत. मघांशी त्यांच्या गांवचा एक कुळवाडी भेटला होता, तो सांगत होता. "

शेखर तेथें जवळच होता. तो चटकन् रमाकाकूंकडे गेला आणि त्यांना धरून म्हणाला,

" होय आजी, दादा आलेत? कुठं आलेत? "

" होय बाबा, आले आहेत हो " रमाकाकू उत्तरल्या, " बिंदूताईकडे आले आहेत. आतां आपण त्यांना नकोशीं झालों आहोंत. " त्यांचा स्वर पिळवटलेला होता.

" मग आपण जाऊं या बिंदूताईकडे. जाशील आजी?—मला दादाकडे घेऊन जाशील? " शेखरच्या आवाजांतला निष्पापपणा रमाकाकूंच्या अंतःकरणास जाऊन भिडला.

" बिंदूला म्हणे दिवस गेले आहेत " श्रीधरकाका म्हणाले. तिला बाळंतपणासाठीं माहेरीं पोंचवायला आलेत ते. "

समोरच्या साऱ्या वस्तु फिरताहेतसें रमाकाकूंना वाटूं लागलें. त्या हातांनी डोकें धरून तशाच खांबाला टेकून बसल्या. बराच वेळ सारें स्तब्ध होतें. इतक्यांत समोरच्या कलमाचा एक पिका आंबा पडला त्याचा धबकन् आवाज आला. रमाकाकू एकदम भानावर आल्या. त्या खांबाला धरून हळूहळू उठल्या आणि आत गेल्या.

त्या रात्रीं रमाकाकूंचा डोळ्याला डोळा लागला नाहीं. त्या नुसत्या तडफडत होत्या. त्यांचं मन राग, अपमान, निराशा यांनीं भरून गेलें होतें. नुकत्याच पाण्यांतून काढलेल्या जाळ्यांतले तडफडणारे मासे सारखे उपडे उताणे, इकडे तिकडे, कधीं एकमेकांच्या खालीं, कधीं वर असे होत असतात तसे त्यांचे विचार होत होते एकहि विचार धड थरत नव्हता. एक विचार मात्र पुन:पुन्हां वर येऊ लागला—बिंदू, तिला होणारें मूल!—प्रथम प्रथम या विचाराचा वाफारा त्याना सहनच होईना. पण त्याचे मन याच विचाराभोंवतीं भ्रमण करू लागलें—बिंदूला मूल होणार ! अग बाई ! पण काय, जगराहटीप्रमाणें केव्हां तरी होणारच होत. अन् झालें म्हणून काय झालें?—पण शेखर!—होय, पण शेखरचें काय नुकसान होणार आहे ? आपल्या मालमत्तेवर बिंदूचा थोडाच हक्क लागूं होणार आहे ! पण असें कशाला ? आपण आपला सारा जमीनजुमला शेखरच्या नांवानेंच करून दिला म्हणजे झालें—संशय नको ! . थोडा वेळ रमाककूंचा जीव शांत झाला. इतक्यात ओटीवरच्या घड्याळांत एकाचा ठोका पडला. रमाकाकूंच्या पोटात धस्स झालें !...शेखर किती लहान ! त्याचें सगळें व्हायचें. कोण करणार हें ? विश्वनाथचा जीव बिंदू व तिचीं मुलें यांच्यातच गुरफटला आहे !...पुन: त्यांचें अंत:करण खदखदूं लागलें. —उन्हाळ्याच्या कांटचीं झुडपें जशीं करपून जातात तसे त्यांच्या मनांतले सारे विचार करपून जाऊं लागले. बऱ्याच वेळ त्या सुन्न होऊन पडल्या. इतक्यांत बाहेर एक पांखरूं ओरडलें. पुन: त्यांना आपल्या मनाची जाणीव झाली. आतां त्यांना, यांत आपला दोष आहे, आपणच अपराधी आहोंत असें वाटूं लागलें. त्यांचें मन मागें वळून पाहू लागलें. गेल्या सहासात महिन्यांतली एकेक गोष्ट त्यांना आठवूं लागली—आणि जसजशी

एकेक गोष्ट आठवे तसतसें त्यांचें मन पश्चात्तापानें जळूं लागलें...खरेंच किती क्षुद्र आपण !--आपलेंच मन किती कोतें ! जांवईबापूंनीं बिंदूला पत्र लिहिलें यांत काय झालें मोठेंसें ! नवऱ्यानें बायकोला पत्रहि पाठवूं नये काय ?...पुन: त्यांच्या मनाची तळमळ सुरूं झाली. यांतून सुटण्यासाठीं की काय त्यांचा अभिमान उचल खाई...आपलेंच बरोबर होतें. त्यांनीं तरी कां असें वागावें ? बिंदूला कुड्या द्यायच्या होत्या तर द्यायच्या होत्या मेल्या !--पण आपल्याला अगोदर दाखवायला नको होत्या का ?... पण लगेच त्यांच्या विचारानें पलट मारली...छट् तें कांहीं नाहीं. आपलेंच चुकलें. आपण इतक्या मोठ्या, अनुभवी ! कांहीं झालें तरी बिंदू मुंबईला गेली तेव्हां तिच्या अंगावरचे दागिने नको होते का द्यायला ? खरंच, केवढा घोर गुन्हा झाला आपला ! जांवईबापू रागावतील नाहीं तर काय ? कोणीहि रागावेल !... त्या स्वतःचा तीव्र निषेध करूं लागल्या...खरंच कशी मी इतकी क्षुद्र, हलकट बनल्यें ?...त्यांना हा विचार असह्य झाला. त्या तडफडूं लागल्या !—त्यांनीं, विश्वनाथला बोलावून त्याच्या स्वाधीन ते दागिने करायचें ठरविलें. बस्स ! हा विचार ठरला मात्र, त्यांचें मन शांत झालें.--दुसऱ्या दिवशीं श्रीधरकाकांना पत्र लिहायला सांगायचें त्यांनीं ठरविलें--आणि जरा वेळानें त्यांना झोंप लागली.

सकाळीं श्रीधरकाकांनीं विश्वनाथला पत्र लिहिलें. चौथ्या दिवशीं त्याचें उत्तर आलें. " मला रजा अगदी थोडी आहे-पण जातांना एकादा दिवस उतरण्याचा प्रयत्न करतों " असें लिहिलें होतें त्यानें.

त्यांनीं आठ दिवस वाट पाहिली. पण तो आला नाहीं. शेखरनें त्याच्या नांवाची जपमाळ घेतली होती. त्याच्या अनंत प्रश्नांना उत्तरें देतांना त्यांना ब्रह्मांड आठवे. अखेरीस त्याला घेऊन दिगंबरपंतांकडे जायचा श्रीधरकाकांनीं बेत केला—

इतक्यांत दुसऱ्या दिवशीं दुपारीं बिंदूच्या माहेराहून एक गडी आला. त्यानें कांही जिन्नस आणि पत्र आणलें होतें. श्रीधरकाकांनीं लगेच पत्र उघडून वाचलें. 'उद्यांचीं मुंबईची मोटार गांठण्यासाठीं आज मला रत्नागिरीस

गेलेंच पाहिजे, म्हणून मी उतरूं शकत नाहीं. या खेपेस सवडलें नाहीं तरी दिवाळीस सौ. बिम्बाला न्यायवयास येईन तेव्हां प्रथम आपल्याकडेच येईन ' असा पत्रांत मजकूर होता. श्रीधरकाका पत्र रमाकाकूंना वाचून दाखवीत असतांनाच शेखरने जिन्नसांचे पुडकें उघडलें आणि ' खाऊ- मला खाऊ ' म्हणत तो नाचूं लागला.

पत्र वाचून झाल्याबरोबर रमाकाकूंनीं गड्याला विचारलें,

" कधीं गेले जांवईबापू ? "

" कल. "

समोर जरा पलिकडे असलेल्या सडकेकडे हात दाखवून रमाकाकूंनीं विचारलें,

" याच वाटेनं गेले ? "

" व्हय तर–दुसऱ्या खयच्या जानार ? "

रमाकाकूंच्या डोळ्यांत चटकन् पाणी आलें. अश्रूंनीं ओथंबलेल्या नजरेनें त्या रस्त्याकडे पाहत राहिल्या. रस्त्याच्या अलीकडेच एका शेतांत भाजावळ जळत होती. त्यांच्या पाण्यारलेल्या डोळ्यांना त्या भाजावळीच्या ज्वाळा सैरावैरा धांवत असतांना दिसल्या.

ऑगष्ट, १९४६



# २ अज्ञात बळी

'नटसम्राटाच्या डोळ्यांत अश्रु !'

'लोकमान्यां'तला हा मथळा माझ्या नजरेस पडला आणि आदल्या रात्रींचा सारा प्रसंग माझ्या मनासमोर उभा राहिला. बालगंधर्वांच्या गायनाचा कार्यक्रम. १९२९ सालीं मी त्यांचे 'एकच प्याला' पाहिलें होतें. त्यानंतर दहा अकरा वर्षांत गंधर्वांचा तो गोड, मन मोहरून टाकणारा स्वर कानावर पडला नव्हता. मी मोठ्या उत्सुकतेनें, गाणें सुरू होण्यापूर्वींच अर्धा एक तास, जाऊन जागा धरून बसलों होतों. बालगंधर्व थोडेसे उशिरानेंच सभागृहांत शिरले. त्यांचा चेहरा विकल, विषण्ण दिसत होता. श्रोते थोडेसें चपापलेच. मोठ्या नाखुषीनें गंधर्वांनीं तंबोरा हातांत घेतला—पण, लगेच तो मागें बसलेल्या मनुष्याच्या हातांत देऊन, श्रोत्यांना उद्देशून बोलण्यास त्यांनीं सुरुवात केली—

त्यांच्या तोंडांतून शब्द फुटल्याबरोबर त्यांच्या विकल वृत्तीचें कारण ध्यानांत आलें.

बालगंधर्वांचा आवाज साफ बसला होता. त्या आवाजांत ते म्हणाले,

'अन्नदाते ! माझा आवाज आज अगदीं बसला आहे. आजचा कार्यक्रम पार पाडण्याची ताकद, देवा, या आवाजांत मुळींच नाहीं. तरीपण मी यत्न करतों. आपल्या कृपेचंच आजवर मी अन्न खाल्लं आहे. आजवर आपणच मला सांभाळून नेलंत, तसंच आज न्या, अशी आपल्या पायाशीं विनंती आहे.'

बालगंधर्वांचें हें भाषण ऐकल्याबरोबर सभागृहांतलें वातावरण एकदम

खिन्न झालें. एकदां गाणें सुरूं झालें म्हणजे आवाज सुटेल अशी आशा करीत आम्ही बसून राहिलों.

'पतितपावना' या अभंगास बालगंधर्वांनीं सुरवात केली. त्यांच्या गळ्यांतून स्वच्छ स्वरच बाहेर पडूं शकत नव्हता. त्यांच्या कंठांतून नेहमीं वहाणाऱ्या संगीताच्या निर्मळ प्रवाहांत आज कोणी तरी केर ओतला होता. क्षणार्धांत यक्षसृष्टि फुलविण्याचें सामर्थ्य ज्या कंठात होतें तो कंठ आज मानवालाहि सहन होऊं शकत नव्हता. साऱ्या सभागृहांत विषादाची गडद छाया पसरली. बालगंधर्व अभंग आळवीत होते. संगीतदेवतेला ती करुणार्त हांकच होती ! पण ती प्रसन्न होण्याचें चिन्ह दिसेना. गंधर्वांची मुद्रा अधिकाअधिक विषण्ण होऊं लागली. त्यांचा स्वर केंविलवाणा होऊं लागला. तें दृश्य पहावेनासें झालें. इतक्यांत—

गंधर्वांचें गायन बंद झालें व ते श्रोत्यांना उद्देशून कांहीं तरी बोलूं लागले. ते बोलत होते, पण तोंडून शब्द फुटत नव्हता. त्यांचा कंठ दाटला आणि डोळयांतून एकदम अश्रू वाहूं लागले.

गंधर्वांनीं डोळ्यांना हातरुमाल लावला—व ते तसेच उठून सभागृहाच्या बाहेर गेले.

घरीं येऊन मी अंथरुणावर पडलों, पण झोंप येईना. महाराष्ट्राच्या सर्वश्रेष्ठ कलावन्ताची ही दुर्दशा कांहीं केल्या मनांतून जाईना. ज्या स्वरानें महाराष्ट्राला एक वेळ मुग्ध केलें होतें तो स्वत:च आज असा मूढ बनावा, हा काळाचा सूड मला भयानक वाटत होता. कलावन्तांना हा सूड केव्हां ना केव्हां तरी बाधणारच का ? निसर्गाचा हा नियमच आहे का ? कलावन्ताचें साम्राज्य त्याच्या डोळयांदेखत उध्वस्त झालेंच पाहिजे का ? प्रतिभेच्या दिव्यांतलें तेल आटून तिच्या वातीवर काजळी धरणार हें ठरूनच गेलें आहे कीं काय ?

या प्रश्नांनीं माझें मन भंडावून सोडलें होतें. किती तरी वेळ मी क्षुब्ध मन:स्थितींत बिछान्यावर तळमळत होतों. त्यांतच केव्हांशीं झोंप लागली. आतां मी जागा झालों तेव्हां रात्रीचे हे प्रश्न विसरलों होतों, पण मन त्रस्त, विषण्णच होतें. इतक्यांत बिछान्याशेजारींच वर्तमानपत्र पडलें आहे असें

ध्यानांत आलें. उचलून पाहिलें तोंच ‘ नटसम्राटाच्या डोळयांत अश्रु ! ’ हा मथळा नजरेस पडला आणि कालचा सारा प्रसंग माझ्या डोळयासमोर जशाचा तसा उभा राहिला—

बालगंधर्वांच्या कलेची ती दुर्दशा ! त्या दृश्यानं जातिवंत अरसिकाच्या जीवाचेंहि पाणी झालें असतं. मला तर कांहींच सुचेना. अस्वस्थ मन:स्थितींतच मी सकाळचे सारे कार्यक्रम उरकले, आणि जरा इकडे तिकडे भटकावें व मुंबईच्या रस्त्यांवरील चित्रविचित्र दृश्यांत मन रमवावें असा विचार करून मी ब्लॉकच्या बाहेर पडलों.

चिराबाजारांत केव्हां आलो माझें मलाच समजलें नाहीं. इतक्यांत एका घोळक्याकडे लक्ष गेलें. रस्त्याच्या कडेला, एका गल्लीच्या टोकाशीं, खूप गर्दी जमली होती. मागचे लोक टांचेवर उभे राहून उंच मानेनें डोकावून पहाण्याचा प्रयत्न करीत होते. एकदोघे एकमेकांना कांही तरी सांगत होते. गर्दीत नव्यानें सामील झालेले लोक काय झालें म्हणून विचारीत होते. कोणाच्याशा तोंडून ‘ पोलीस ’ असा कांही तरी उद्गार बाहेर पडला. इतक्यांत ‘ वेरी येऊन पडलाय बिचारा ! ’ हे शब्द माझ्या कानांवर आले आणि मी एकदम त्या घोळक्यांत शिरलों. कां नकळे, कसली तरी विलक्षण जबाबदारीची, अधिकाराची जाणीव माझ्या अंगांत शिरली. या गर्दीतले इतर सारे नुसते बघे आहेत, आपण मात्र निराळे आहोंत अशी भावना संचारली.—एकदम त्या गर्दीत घुसलों व तो मनुष्य पडला होता तेथपर्यंत येऊन पोंचलो.

तें दृश्य ! एक हाडाचा सांपळा तेथें पडला होता. फाटक्या, विटक्या घाणीचीं पुटें बसलेल्या कपड्यांतून त्याच्या शरीराचें जें दर्शन होत होतें त्यानं रोगट निर्जीवतेचा साक्षात्कारच मला झाला. त्या शरीरावरची त्वचा सागवानाच्या शुष्क करपट पानाप्रमाणें भासत होती. डोळे मळकट कांचेच्या मण्यासारखें दिसत होते. हातापायाच्या काड्या कुजट बांबूची आठवण करून देत होत्या. त्याला नुकतीच रक्ताची गुळणी झाली होती. त्याच्या शर्टच्या बाहीवरील तो रक्ताचा डाग !—मुंबईतल्या साऱ्या रोगराईनें

तेथें हजर होऊन तिनें आपल्या अस्तित्वाचा तो शिक्काच मारला कीं काय असें वाटत होतें.

माझी नजर जरा बाजूला वळली. पलीकडेच एक लहानशी बाटली पडली होती. मी झटकन पुढें झालों व ती बाटली उलचली. ती औषधाची बाटली होती. बाटलीवरच्या मळकट लेबलावर ठाकुरद्वारच्या धैर्यवान डॉक्टरचें नांव होतें. हा इसम डॉक्टरकडून औषध घेऊन येतां, येतां घेरी येऊन पडला होता, एवढें यावरून ध्यानांत आलें. लेबलावर रोग्याप्रमाणें त्याच्या नांवावरहि अवकळा पसरली होती. शाईनें लिहिलेलें तें नांव अगदी पुसट झालें होतें. मी तें वाचण्याचा प्रयत्न करूं लागलों—

आणि मला एकदम धक्का बसला ! सदाशिव नारायण शिंत्र—हें तर परिचयाचें नांव ! कोण हा ? क्षणभरांत ध्यानांत आलें. मी तांबडतोब गर्दी फोडून बाहेर आलों व रस्त्यानें जाणारी एक व्हिक्टोरिया उभी केली. माझी हालचाल पाहून लोकहि माझ्याशीं सहकार्य करूं लागले. दोघातिघांच्या मदतीनें मी सदाशिवला गाडींत ठेवला. त्यांतला एकजण 'मीहि येतों' म्हणाला आणि माझ्या मागोमाग गाडींत चढला.

'ठाकुरद्वार चलो !' मी व्हिक्टोरिआवाल्याला इशारा दिला.

व्हिक्टोरिआ सुरूं झाल्यावर मनांत सदाशिवबद्दलचे विचार सुरूं झाले. सदाशिव माझा बालमित्र—लंगोटीयार दोस्त ! माझा कोंकणचा संबंध सुटल्यापासून गेल्या पंधरावीस वर्षांत सदाशिव काय करतो, कुठे असतो याचा मला पत्ता नव्हता. लहानपणीं एका घरट्यांत वाढलेले पक्षी मोठे झाले म्हणजे निरनिराळ्या दिशानीं उडून जातात तशी आमची स्थिति झाली होती. बालपणचा काळ आठवला म्हणजे मधूनच केव्हां तरी सदाशिवची आठवण होत असे, पण पुन्हा आम्ही केव्हां तरी एकमेकांना भेटूं असें फारसें कधीं मला वाटलें नव्हतें. अशा विपन्न अवस्थेंत तो माझ्या दृष्टीस पडेल, ही कल्पना तर मनाला शिवणेंहि शक्य नव्हतें. त्या वेळचा तो दणकट, मजबूत अंगापिंडाचा सदाशिव आणि आजचा हा सदाशिव ! —श्रावणमासीं सागराचें वैभव उधळीत जाणारी नदी वैशाखांत

शेवाळाचीं लक्तरें पांघरून कशीबशी अंग चोरून वाहते. सदाशिवच्या जीवनप्रवाहाची तशीच दुर्दशा झाली होती.

सदाशिवची कधीं काळीं आठवण झाली तर मला तो श्रावणांतला पुराचा प्रसंग आठवे. आतां तोच प्रसंग माझ्या डोळ्यांसमोर नाचूं लागला...... खूप पाऊस पडत होता. गुरें सुटून गेलीं नि पावसास सुरवात झाली. पिंपें व पातेलीं भरभरून कुणी तरी एकसारखा पाण्याचा मारा करावा तसा तो पाऊस ओतत होता. जिकडे तिकडे पाणीच पाणी झालें. संध्याकाळच्या सुमारास पावसाचें मान फारच वाढलें. आमच्या गांवांतला ओढा घों घों वाहूं लागला. अंग पिळवटत, गिरक्या खात, भोंवरे फिरवीत चाललेल्या त्याच्या त्या तांबड्या लाल पाण्यावर कुणाची नजर ठरेना. गांवचीं गुरें आणि जांगळी पलीकडच्या कांठावर येऊन अडकून पडले. त्यांत कित्येक बेफाम जनावरें होतीं. आणि कांहीं उमदे नवजवान होते. पण वैतरणीचें काळरूप धारण करून वहाणाऱ्या त्या पुरांत उडी घालण्याची एकाचीही हिंमत होईना. कल्लोळ व कोलाहल तेवढा माजला. विजांची कडकड, ढगांची गडगड; झाडांची कडाड्मोड !—यांतच गुरावासरांच्या हंबरण्याची व बायाबापड्यांच्या ओरडाओरडीची भर पडली. इतक्यांत एकाएकीं सदाशिव तेथें आला. आणि डोक्यावरची घोंगडी दूर फेंकून देऊन त्यानें पुराकडे धांव घेतली. आम्ही सारेजण त्याच्या मागें धांवत सुटलों. या यमप्रलयांत उडी न घेण्याची त्याला विनंती केली. त्याच्या मामानें काकुळतीस येऊन दयायाचना केली. पण सदाशिवनें एक अवाक्षर न काढतां त्या पुरांत उडी घेतली — आणि क्षणभर आमचे हृदय अगदीं थांबलें ! काय झालें नकळे, सदाशिव दिसेनासा झाला. इतक्यांत एकदम त्याचें डोकें दिसूं लागलें. डोकें तेवढेंच ! तोंच वरून एक साप वहात आला—अरे बापरे !— अगदीं सदाशिवकडेच चालला !... पण सदाशिवनें त्याला अलगद उचलून बाजूला फेंकून दिला. इतका वेळ पाण्यांत बुडालेला सदाशिवचा हात आतां आम्हाला दिसला. त्यानें जोरानें हात मारण्यास सुरवात केली–आणि पाण्याच्या लोंढ्याशीं झुंजून तो पलिकडे गेला. तो कांठावर चढल्याबरोबर तेथील जांगळी त्याच्याकडे धांवले. पण

तो त्यांच्याशीं कांहींही बोलला नाहीं. तो मुकाट्यानें एका गुरांकडे गेला. आणि कानाला धरून त्यानें त्याला ओढ्याकडे आणलें व तशीच पुरांत उडी घेतली !– आतां तें सारें स्वप्नांतच पाहिल्यासारखें वाटू लागलें.— एखादें लहान मूल हाताला धरून या खोलींतून त्या खोलींत न्यावें तसें सदाशिवनें तें जनावर पलीकडच्या तीरावरून अलीकडच्या तीरावर आणलें. आणि गुराची मोनजात तरी किती शहाणी ! इरसाल आडदांड आणि मारकुटें जनावर त्या क्षणीं गोगलगाईसारखें झालें. सदाशिवचें हें कृत्य पाहिल्याबरोबर पलीकडच्या जांगळ्यांतला एक जवान पोरगा पुढें झाला; व त्या दोघांनीं मिळून सारीं जनावरें, माणसें अलीकडे आणलीं. सदाशिव अलीकडे आल्याबरोबर— मला राहवलें नाहीं— मी गेलों व त्याला मिठी मारली -- आणि श्रमानें विगलित झालेला सदाशिव माझ्या हातांत निश्चेष्ट होऊन पडला !...

सदाशिवची तेव्हाची ती निश्चेष्ट मूर्ति आणि आतांची ही मूर्ति ! त्यांची तुलना मला सहन होईना. किनाऱ्यावरचा कडा उखडण्याच्या आवेशानें धडक देणारी समुद्राची लाट त्या कड्याच्या पायथ्याशीं छिन्न-विच्छिन्न होऊन फेंसाळून पडावी तशी सदाशिवच्या जीवनाची स्थिती झाली होती.

हा विचार माझ्या मनांत आला आणि मला लहानपणचा दुसरा एक प्रसंग आठवला !... माझी उन्हाळ्याची सुटी सपली आणि मी शाळे-साठीं रत्नागिरीस जाण्याची तयारी केली. मला जातांना आंब्याची एक करंडी न्यायची होती. पण यंदा आंब्याचा मोसम लवकर संपला होता. फक्त करंबेळकर खोताच्या कलमावर थोडेबहुत आंबे होते. मी व सदाशिव करंबेळकराकडे गेलों आणि थोडेसे आंबे विकत मिळतील का विचारलें. करंबेळकर खोत मोठा खाष्ट म्हातारा होता. आमच्यावर तर त्याचा मोठा राग. मी, सदाशिव व आमच्या उनाडक्यांत सामील असणारे आणखी दोघेजण यांना तो चांडाळचौकडी म्हणत असे.— आमच्यांत एक कुळ-वाड्याचा पोरगा होता. हा, त्या ब्राह्मणाच्या मतें, आमचा सर्वांत मोठा गुन्हा. आमची मागणी तोंडांतून बाहेर पडल्याबरोबर म्हातारा कडाडला,

" कांहींएक मिळणार नाहीं. मोठे आले आंबे मागणारे! चला, चालते व्हा येथून!" त्यानें आम्हाला अक्षरशः हांकून लावलें. आम्ही हिरमुसले चेहरे करून निघालों. येतां येतां, ' उनाड शिंचे! यांच्या बापाच्या घरचा माल कीं नाहीं?' हे त्याचे उद्गार आमच्या कानांवर आले. आंब्याची बाब क्षुद्र होती, पण हे उद्गार ऐकल्याबरोबर सदाशिव उसळला. ' या थेरड्याचं कलमच्या कलम आज उतरल्याशिवाय सोडणार नाहीं!' अशी त्यानें तेथच्या तेथें प्रतिज्ञा केली. मी म्हटलें, ' जाऊं दे रे. त्याच्या काय नादाला लागायचं!' ' तें कांहीं नाहीं. म्हाताऱ्याची पुरी खोड मोडली पाहिजे. '— सदाशिवचा स्वर निर्वाणीचा होता.

मध्यरात्रीच्या सुमारास सदाशिव माझ्याकडे आला आणि चल म्हणाला, ' नको रे, कशाला उगिच?' मीं म्हटलें. पण सदाशिवच्या निर्धारापुढें माझें कांहीं चालण्यासारखें नव्हतें. मी उठलों. आम्ही अंगणांत आलों. रात्र किर्र काळोखाची होती. त्यांतच आकाश भरून आलें होतें. मीं म्हटलें, ' थांब, कंदिल घेतों ' ' अ ह. कंदिल नको. तो आपलं बिंग फोडील. तू तसाच चल. मी सारी व्यवस्था केली आहे. ' असें म्हणून सदाशिवनें हातांतली बॅटरी दाबली. त्याच्या पुण्याच्या मामानें ती त्याला दिलेली होती. त्यानें बरोबर येतांना एक झारा, गोणता आणि दोरीहि आणली होती. आम्ही करंबेळकरांच्या आंबराईकडे निघालों. त्या कलमाखालीं आल्याबरोबर सदाशिवनें दोरी गोणत्याला बांधली व तिचें एक टोंक तोंडांत धरून तो कलमावर चढूं लागला. तो वर चढून गेल्याबरोबर कलमावरच्या घरट्यांत झोंपलेले दोन कावळे ' काव् काव् ' करीत उडाले. ' हे खोताकडे जाऊन चहाडी करतील कीं काय?' अशी एक विचित्र शंका माझ्या मनांत आली. परंतु सदाशिवचें तिकडे लक्षच नव्हतें. तो या फांदीवरून त्या फांदीवर जाण्यांत गढून गेला होता. अखेरीस एका फांदीवर तो बसला व त्यानें बॅटरी दाबली, आंबे न्याहाळले आणि हाताला येतील ते आंबे काढून गोणत्यांत भरण्याचा सपाटा चालविला. गोणता भरल्यावर त्यानें तो दोरीनें खालीं सोडला. मी तो झाऱ्यांत रिकामा केला. जरा वेळानें दुसरा गोणता खालीं आला. मी तो रिकामा केला आणि ' आतां पुरे ' म्हटलें. पण

त्याचें तिकडे लक्षच नव्हतें. आंबे तोडण्याचें त्याचें कार्य अव्याहत सुरू होतें. मध्येंच बॅटरी दाबली जाई, प्रकाशाचें एक छोटेसें विश्व उमले, त्यांत आंबे न्याहाळले जात आणि ते देठापासून वेगळे करण्याचें कार्य सुरू होई. अखेरीस सबंध हारा भरला. मी त्याला तसें सांगितलें. 'हारा भरला तर आंबे फेंकून देऊं. पण सारं झाड खाली झालं पाहिजे. त्याशिवाय म्हाताऱ्याला पुरी अद्दल घडायची नाहीं !' तो म्हणाला 'अरे पण, सारं झाड उतरलं तर सकाळीं उठल्या बरोबर बोंबाबोंब होईल ना ?' मी म्हटलें. यावर सदाशिव कांहीं बोलला नाहीं. तो मुकाट्यानें खालीं आला, आम्ही घरीं आलों तेव्हां रात्र परतली होती. माझ्या घरची मंडळी हा आमचा 'पराक्रम' पाहून चकित झाली. जरा वेळानें आम्ही सामान आवरलें आणि पलीकडच्या रस्त्यावरून रत्नागिरीस जाणाऱ्या गाड्या पहांटेच्या सुमारास येत त्यांपैकीं एक ठरवून मी रत्नागिरीस निघून गेलों.

पुढच्या सुटींत मी गांवीं आलों तेव्हां, मी निघून गेल्यावर जो हलकल्लोळ उडाला त्याचें मोठें सुरस वर्णन सदाशिवनें केलें. झाडावरचे आंबे कमी झाल्याचें सकाळींच करंबेळकराच्या ध्यानांत आलें. तो हातपाय आपटीतच सदाशिवच्या मामाकडे आला आणि त्याच्याकडे त्यानें सदाशिवविरुद्ध कागाळी केली. सदाशिवनें साफ कानावर हात ठेवले. पुरावा कांहींच नव्हता, पण सदाशिवच्या कृत्याबद्दल मामाला मुळींच शंका उरली नाहीं. तरीपण भाच्यावर त्याचें विलक्षण प्रेम होतें. बहीण वारल्यानतर चार वर्षांच्या आईवेगळ्या सदाशिवला त्यानें आपल्याकडे आणून मोठ्या ममतेनें त्याचें पालनपोषण केलें होतें. त्यानें करंबेळकराला पुराव्याचा सवाल केला. त्याबरोबर म्हातारा असा कांहीं भडकला !— त्या वेळची त्याची ती मुद्रा, तें रागानें थरथरणारें शरीर, त्याच्या तोंडून चालणारा अपशब्दांचा सपाटा !— सदाशिव म्हणाला, 'जणूं त्या आंब्याच्या झाडावरचा एखादा समंधच येऊन थापीत होता !' करंबेळकराच्या त्या वेळच्या अवताराची व उद्गारांची अशी फक्कड नक्कल सदाशिव करीत असे कीं आमची हसतां हसतां मुरकुंडी वळे !

सदाशिव नकला करण्यांत वस्ताद होता. त्याचें बोलणें स्वभावतःच ठसठशित असे. स्पष्ट, जोरदार उच्चारांमुळें, शाळेंत असतांना, वाचनांत तो नेहमीं वर असे. चौथीच्या पुस्तकांतला ' अतिथी आणि राजा ' हा धडा वाचतांना अतिथीचें तें शेवटचें भाषण त्यानें असें सुंदर वाचलें होतें कीं, मास्तर अगदीं खूष होऊन गेले. त्या अतिथीच्या स्वरांतली सारी निःस्पृह गंभीरता त्यानें आपल्या आवाजांत उतरवली होती. क्षणभर तो अतिथीच त्या मुलाचें रूप घेऊन आला कीं काय असें आम्हाला वाटलें.

राजाचा राजवाडा ही एक धर्मशाळाच आहे असें त्या अतिथीचें म्हणणें होतें. आजची शाळा सुद्धां एक धर्मशाळाच होती. चौथी इयत्ता होइपर्यंतच आमचें त्या शाळेंत वास्तव्य होतें. चौथीची परीक्षा पास झाल्यावर मी रत्नागिरीला इंग्रजी शाळेंत जाऊं लागलों. पण बिचारा सदाशिव ! घरीं सावत्र आई आणि मामाकडे गरिबी ! चौथी इयत्ता झाल्यावर त्याची शाळा सुटली. मात्र तो मामाकडेच राहिला. सुटींत घरीं आलों कीं आमची भेट होई, जुन्या मैत्रीस पालवी फुटे आणि आमचा उनाडक्यांचा कार्यक्रम पूर्वीप्रमाणें सुरू होई...

बरोबर आलेल्या माणसानें व्हिक्टोरिआ उभी केली नि माझ्या ध्यानांत आलें कीं, धैर्यवान डॉक्टरचा दवाखाना आला. मी व्हिक्टोरिआवाल्याला जरा थांबायला सांगितलें. व आम्हीं दोघांनी सदाशिवला उचलून दवाखान्यांत नेलें. सदाशिव अजून बेशुद्धच होता. डॉक्टरना मीं सारी हकीगत सांगितली. त्यांनीं त्याची नाडी तपासली आणि हातांतली स्टेतो-स्कोपची नळी हालवीत ते म्हणाले,

' मला कांहीं याची फारशी आशा दिसत नाहीं. ' व नंतर माझ्याकडे वळून त्यांनीं विचारलें, ' हा मनुष्य तुमचा कोणी आहे का ? '

या प्रश्नाचें काय उत्तर द्यावें हेंच मला कळेना. क्षणभर थांबून मी म्हटलें,

' नाहीं, तसा तो माझा कोणी नातेवाईक वगैरे नाहीं. '

' त्याचं येथं कोणी नात्यागोत्याचं ? '

'नाहीं बुवा ! मला कांहीं माहित नाहीं.' मी म्हटलें व बरोबर आलेल्या इसमास विचारलें,

'काहो, तुम्हाला कोणी माहित आहे का ?'

त्यालाहि कांहीं माहित नव्हतें.

'मग हा आहे तरी कोण, कुठला ?' डॉक्टर उद्गारले. 'हा एक दिवस माझ्याकडे आला. मीं त्याला तपासलें. त्याला क्षय आढळला. क्षयाच्या रोग्याला जें सांगतात तें सारं सांगितलें. पण त्यांतलं तो कांहीं करूं शकेल असं मुळींच दिसत नव्हतं. मी त्याच्या उद्योगधंद्याची चवकशी केली. पण कसलंहि समाधानकारक उत्तर त्यानं दिलं नाहीं. त्याच्या लाचार चेहऱ्याची मला दया आली. मी त्याला प्रिस्क्रिप्शन लिहून दिलं आणि याच्या औषधाचं बिल करूं नको अशी कंपौंडरला सूचना दिली. गेले दोन अडीच महिने तीनचार तीनचार दिवसांनीं येऊन तो औषध घेऊन जाई. एक दिवस त्यानं पांच रुपयांची नोट आणून दिली. हा फार दिवसांचा सोबती नाहीं हें मीं ओळखलं होतं. रोज औषध न्यायला येणं त्याला शक्य नाहीं हेंहि दिसत होतें. औषध आणायला स्वतः न येतां कोणाला तरी पाठवीत जा म्हणून एक दिवस त्याला सांगितलं. त्यावर तो कांहीं बोलला नाहीं. पण स्वतःच येत राहिला. आज...'

डॉक्टर हें बोलत आहेत तोंच सदाशिवला ठसका लागल्यासारखा आवाज आला. आम्ही सारे त्याच्याकडे पहातों तोंच त्याच्या तोंडातून एक रक्ताची गुळणी आली व त्यानें डोळे फिरवले. डॉक्टरनीं नाडी हातांत घेतली आणि सर्व कारभार आटोपला असें खुणेनेंच सांगितलें.

आतां काय करणार ? डॉक्टरनीं पोलिस-स्टेशनवर फोन केला. पोलिस आले. चवकशी झाली. त्याचा पत्ता काढण्यांत आला. पंचनामा वगैरे सारे विधि उरकण्यांत आले. आणि अखेर प्रेत आमच्या ताब्यांत देण्यांत आलें. आम्ही एक अँब्युलन्स बोलावली आणि पुढचे संस्कार उरकण्यासाठीं प्रथम प्रेत चिराबाजारांतल्या त्याच्या बिऱ्हाडीं नेलें.

शेजारीपाजारी गोळा झाले. बायबापड्यांनीं मदत केली आणि सकाळीं नऊ दहा वाजतां मन हलकें करायला म्हणून बाहेर पडलेला माझा जीव

एका बालमित्राचा मृतदेह घेऊन दुपारी दोनतीनच्या सुमारास सोनापुरची वाट चालूं लागला.

माझा देह आणि मेंदू अगदीं शिणून गेला होता. मी प्रेताबरोबर चाललों होतों, पण आम्ही कोणीकडून कसे जात होतों याचा नीटसा बोध मला होत नव्हता. डावीकडच्या उंचच उंच भिंतीची मला जाणीव झाली आणि आम्ही सोनापुरच्या बाहेरच्या बाजूस आलों आहों हें माझ्या ध्यानांत आलें. आंत एखादें प्रेत जळत असावें. त्याचा धूर वर जात होता. बाहेर रस्त्यावरून मोटारी उडत होत्या. जीवन आणि मृत्यु यांच्यामध्यें एवढी ही भिंतच उभी आहे, असें मला वाटलें.

इतक्यांत त्या भिंतीवरच्या जाहिरातीकडे माझें लक्ष गेलें. जगाचे नानाविध रंग त्या भिंतीवर जाहिरातींच्या रूपानें उधळले होते. इन्शुअरन्स, रेडिओ, सिनेमा अशा कितीतरी जाहिराती भिंतीवर होत्या. इन्शुअरन्स कंपनीची जाहिरात पाहून मला फार मौज वाटली. ती तेथें लावणारा खरोखरच फार चतुर असला पाहिजे. विम्याच्या जाहिरातीला स्मशानाच्या भिंतीइतकें उत्तम ठिकाण दुसरें कोणते असूं शकेल! माझ्या मनांत विचार आला, सदाशिवनें विमा उतरला असेल का! किती विचित्र विचार होता तो! आज सारखें दिसत असलेलें त्याचें दैन्य आणि विमा यांचा मेळ बसूं शकतो का? आणि कोणासाठीं विमा उतरणार होता तो! हे प्रश्न विरतात न विरतात तोंच 'गीता' बोलपटाची जाहिरात दृष्टीस पडली. ही जाहिरात देखील स्मशानभिंतीवर किती शोभून दिसते! श्रीकृष्णानें अर्जुनाला गीतेचा संदेश निधनभूमीवरच सांगितला होता. समाधानानें मृत्यूचें स्वागत कसें करावें हें गीतेंत सांगितलें आहे. विमा आणि गीता यांचा संदेश एकच आहे हें आतां माझ्या ध्यानांत आलें. विमा आणि गीता यामधील हें साम्य माझ्या डोक्यांत नीटसें ठसण्यापूर्वीच, 'रंगभूमीच्या पुनरुज्जीवनासाठीं स्थापन झालेल्या नवनाट्य लिमिटेड'ची जाहिरात माझ्या डोळ्यांना दिसली —

आणि शेक्स्पीअरचें तें वचन मला आठवलें. All's the world a stage! जग ही एक रंगभूमिच आहे आणि आपण सर्व तिच्यावरचीं पात्रें

आहोंत. वेळ आली की आपण येथें येतों अन् काम संपलें कीं निघून जातों. सदाशिवचें काम संपलें आणि म्हणून तो आज पडद्याआड चालला. एकदम ती भिंत मला जगाच्या रंगभूमीचा पडदा वाटूं लागली !

सदाशिव आणि रंगभूमि !

मला लहानपणचा एक प्रसंग आठवला. एका सुटींत आम्ही, आमच्या चांडाळचौकडीनें, कुठें तरी भटकायला जायचें ठरविलें. नेहमींच्या जिण्याचा कंटाळा घालविण्यासाठीं हा छोटयाशा प्रवासाचा कार्यक्रम आम्ही काढला होता. कुठें जायचें, कसें जायचें वगैरे आम्ही कांहींच नीटसें ठरविलें नव्हतें. वाट फुटेल तिकडे स्वैरसंचार करायचा असा आमचा विचार होता. बेफिकीरीची हौस आम्हाला आली होती. चारसहा दिवसापुरते जिन्नस आम्ही घेतले आणि गांवाच्या बाहेर पडलों. आम्ही कोण आहोंत, कुठून आलों, कुठें जाणार, वगैरे काहीं एक न सांगतां, एक प्रकारच्या अज्ञातवासाचा आनंद लुटीत आम्ही सायंकाळच्या सुमारास एका गांवांत आलों आणि तेथल्या धर्मशाळेंत मुक्काम केला. आमच्या जवळ धान्य होतें, पण तें शिजवायचें कशांत ? गांवांत एकादें ब्राह्मणाचें घर आहे का याची आम्ही चौकशी केली आणि तेथें जाऊन जेवण करण्यापुरती भांडी मागितलीं. घरच्या पुरुषानें आमच्याकडें थोडें कुतूहलानें, थोडें अविश्वासानें पाहिलें आणि आम्ही कोण, कुठून आलों वगैरेची चौकशी करण्यास सुरवात केली. हें तर आम्हाला सांगायचें नव्हतें आणि कल्पित बनावट हकिगत सांगण्याचा आम्हाला सराव नव्हता. त्याच्या प्रश्नांची कांहीं तरी, कशीं तरी उत्तरें आम्ही दिलीं, पण त्यांतली आमची घांदल अगदीं स्पष्ट होती. ती पाहून आमच्याविषयीचा त्याचा अविश्वास थोडासा वाढलाच असावा. पण कोंकणच्या पाहुणचाराच्या कल्पना एवढ्यातेवढ्यानें ढळणाऱ्या नसतात. त्यानें आम्हाला भांडी दिलीं मात्र, आम्ही पाठ फिरवून जरा दूर आल्यावर, 'चालले असतील नाटकांत पळून, दुसरें काय ?' असे त्यानें काढलेले उद्गार आमच्या कानावर पडले. ते ऐकतांच मी एकदम ओशाळलों. सदाशिवचा चेहराहि थोडासा बदलला. पण त्याची खेळकर वृत्ति एकदम जागी झाली व तो म्हणाला,

'यांना आपण एकादं नाटक करून दाखवूं या रे! — म्हणजे खूष होतील ते!'

मी यावर कांहीं बोललों नाहीं. पण जरा वेळानें या विषयांतला विषाद ओसरल्यावर, आम्ही एकमेकांची 'नाटकी' म्हणून थट्टा करूं लागलों. आमच्या गांवातल्या यात्रेंत नुकतेंच 'रामराज्यवियोग' नाटक झालें होत, त्यांत कोणाला कोणतें काम शोभलें असतें यावर आमची चर्चा सुरू झाली. मी सदाशिवला म्हटलें,

'तूं वशिष्ठ ऋषींचं काम फार फक्कड केलं असतंस.'

हें म्हणतांना मला 'अतिथी आणि राजा' या धड्यांतलें तें सदाशिव वाचून दाखविलेलें अतिथीचें भाषण आठवलें. —'हा राजवाडा म्हणजे एक धर्मशाळा आहे; हें जग म्हणजे देखील एक धर्मशाळाच आहे.' एका धर्मशाळेत बसूनच आमचें हें बोलणें चाललें होतें. किती मजेदार योगायोग!

थट्टामस्करी थोडीशी ओसरल्यावर मीं सदाशिवला म्हटलें, 'खरंच सदाशिव, तूं नाटकमंडळींत कां जात नाहींस? तूं काम किती फक्कड करशील! नाहीं तरी तूं मामाकडे राहून काय करणार आहेस? मामाची शेतीभातीच कीं–नाहीं? बाकी, नाटकांत जाणं म्हणजे —'

माझें वाक्य पुरें होण्यापूर्वींच सदाशिव म्हणाला,

'होय गड्या! मलाहि नाटकाच्या धंद्यात पडावेसं खूप वाटतं. यंदां देवळाच्या नाटकांत मी काम देखील करणार आहे.'

पुढील सुट्टींत मी घरीं येण्यापूर्वींच सदाशिव कोणत्याशा नाटकमंडळींत निघून गेला होता. त्यानंतर लवकरच माझा कोंकणचा संबंधच तुटला, आणि सदाशिवचें पुन: कधीं दर्शनच झालें नाहीं.

ही सारी आठवण माझ्या मनांत आकारते आहे तोंच आम्ही सोनापुरच्या दरवाज्यापाशीं येऊन पोचलों. त्या दरवाज्यानें आंत शिरतांना, रंगभूमीवरील पडद्याची मला पुन: एकदां आठवण झाली. सदाशिव पडद्याच्या आंत शिरत होता. त्याचें काम संपलें होतें.

सदाशिव आणि रंगभूमि! माझ्या मनांत प्रश्न उद्भवला, इतकीं सारीं वर्षें सदाशिव नाटकांतच होता कीं काय?

सदाशिवच्या शेजारीं राहणारे चारदोन इसम प्रेतयात्रेस आलेले होते. त्यांच्यापैकीं एकाद्याला याबाबत विचारतां आलें असतें. पण प्रथम प्रेत-दहनाच्या तयारीस लागणें भाग होतें. सारे कायदेशीर व धार्मिक विधि आटपल्यावर चितेला अग्नि मिळाला व मला थोडी उसंत मिळाली. त्या-बरोबर सदाशिवचा विचार मनांत पुन: उसळूं लागला. पण मला एकदम त्याच्याबद्दल विचारावेंसें वाटेना. वैताग आणि विपण्णता यांनीं भरलेल्या तेथल्या वातावरणांत कांहीं कोणाशीं बोलावें असेंच वाटत नव्हतें. मी चितेकडे नजर लावून स्तब्ध बसून राहिलों.

इतक्यांत चिता पेटूं लागली. एकाद्या नागिणीनें सांदीफटींतून बाहेर यावें तशा विस्तवाच्या ज्वाळा सरणाच्या सांदीतून येत होत्या. विस्तवाच्या किणकिण्या वर उडून विझत होत्या. माणसाचें जीवन कसें क्षणभंगुर आहे हेंच जणूं त्या दाखवीत होत्या! इतक्यांत चितेंत कसलासा स्फोटक आवाज झाला आणि चितेंतून एक ज्वाळा वर उफाळली. त्या ज्वाळेंत धगधग आणि विपण्णता होती

—सदाशिवचें आयुष्य असेंच होतें का?

मी एकदम, शेजारीं बसलेल्या इसमास विचारलें,

'काहो, हा इसम काय करीत असे, वगैरे तुम्हाला कांहीं माहित आहे का?'

'तशी फारशी कांहीं माहिती नाहीं,' तो उत्तरला. 'पण कोणत्याशा नाटकमंडळीशीं त्याचा कांहीं तरी संबंध असावा असें वाटतें.'

'मग?'

'मग काय, त्या नाटकमंडळीपायींच त्याची दुर्दशा उडाली.'

'दुर्दशा!'

'होय तर काय? आमच्या शेजारीं तो राह्यला आला तेव्हां त्याची स्थिति साधारण बरी होती. तो कुठल्याशा कंपनींत नोकर होता. पुढं त्यानं वाटतं स्वत:चीच कंपनी काढली. आम्हाला तरी काय ठाऊक? त्याचं आमचं जाणं येणं नव्हतं. पण आमच्या चाळीचं भाडं वसूल करणारास त्यानं पहिल्या खेळाचा पास दिला होता, त्याच्याकडून आम्हाला समजलं.

तो खेळ अगदीं पडला—व त्यामुळंच हा असा धुळीला मिळाला ! '

' तो कसा काय ? ' मी विचारलें.

' आम्हाला कांहीं नक्की माहित नाहीं, पण आपलं ऐकलं तें सांगतों. त्यानं आपला पहिला खेळ ठाण्याला कीं कल्याणला कुठंसा लावला होता. धड वीसपंचवीस प्रेक्षकहि त्या खेळाला आले नाहींत. थेटरचं भाडंहि वसूल झालं नाहीं. नटनटींचे पगार, सामानाचं भाडं वगैरे बरंच कांहीं तरी द्यायचं राह्यलं असावं. अखेर, व्हायचं तें झालं. फिर्याद झाली अन् एक दिवस बेलीफ जप्तीला आला ! '

' अरेरे ! ' माझ्या तोंडून उद्‌गार निघून गेला.

' आम्हालाहि तें पाहवेना. जप्तींत मिळायला होतं काय ? होतं नव्हतं तें सामान अगोदरच गेलं होतं. नाटकाचीं पुस्तकं, नकलांच्या फाटक्या चोपड्या आणि एक मळकट पथारी —यांनी काय भागणार होतं ? कोटाच्या खिशाची झडती झाली. शर्टच्या हाताला बटणंबिटणं आहेत किंवा काय हेंहि बेलिफानं पाहिलं. अखेरीस--'

' अखेरीस काय ? ' मी अधीरपणें विचारलें.

' त्याच्या दंडांत एक सोन्याचा ताईत होता तोहि बेलिफानं काढून घेतला. त्या वस्तूला बेलिफानं हात घातल्याबरोबर त्याच्या डोळ्यांतून खळकन् पाणी आलं ! '

एवढें सांगून थांबला. पण लगेच म्हणाला.

' त्या दिवशीं रात्रीं त्याला ताप आला. त्यांतून तो बरा असा कधीं झालाच नाहीं. '

ही हकीगत ऐकल्याबरोबर माझ्या डोक्यांत लख्खन् प्रकाश पडला. ' नटसम्राटाच्या डोळ्यांत अश्रू ! ' या सकाळीं वाचलेल्या मथळ्याचा पूर्ण अर्थ आतां माझ्या ध्यानांत आला. सदाशिव हा आमच्या रंगभूमीच्या दुर्दशेचा एक अज्ञात बळी होता. लहानपणीं पुराच्या लोंढ्याबरोबर सहज लीलेनें धडक घेणारा सदाशिव आमच्या नाट्यजीवनाच्या अधःपाताबरोबर पार वाहून गेला होता. राजवाडा म्हणजे धर्मशाळा हें वाक्य आपल्या नाट्य-पूर्ण वाचनानें आमच्या मनांत कायमचें ठसविणारा हा जन्मजात नट रंग—

भूमीच्या जगांत धर्मशाळेंतलेंहि सुख भोगूं शकला नाहीं. मराठी रंगभूमीच्या दुर्दैवामुळें बालगंधर्वांसारख्या नटसम्राटाच्याच जीवनाची शोककथा झाली असें नाहीं. बालगंधर्वांच्या कालच्या अश्रूंत जी असहायता आणि जो शोक भरला होता, त्याहून सदाशिवच्या डोळ्यांतून त्या बत्तीनें काढलेल्या अश्रूंतली असहायता आणि शोक कमी अर्थपूर्ण नाहीं.

—डिसेंबर १९४५

---

३

# एक मांजरी आणि तिचीं तीन पिलें

माझी मांजर पाळण्याची हौस अगदीं योगायोगानेंच निर्माण झाली.

त्याचें असें झालें—

एकदा एक मांजरी आमच्याकडे आली आणि आंब्याच्या करंडींत व्याली. तिला दोन पिलें झालीं. त्यांतलें एक आठदहा दिवसांतच मेलें. आणि दुसरें, सारें दूध एकट्यानें खाऊन चांगलें गुबगुबित झालें!

किती सुंदर होतें तें पोर! पांढरें स्वच्छ—आणि शेपटी तेवढी काळी आणि झोकदार! पण तें दिसायला जितकें सुरेख होतें त्याहून अधिक खेळकर होतें. मांजराचीं पिलें खेळकर असतात, पण हें संध्याकाळीं बागेंत आमच्याशीं शिवाशिवी खेळे!

पण......

एक दिवस त्यानें कसलासा विषारी प्राणी खाल्ला आणि तासभरांत तडफडून मेलें!

तें पोर गेलें, पण विलक्षण ओढ लावून गेलें. दोन दिवस मला अन्न गोड लागलें नाहीं. कुठेंहि दृष्टि टाकली कीं कांहीं तरी चुकल्याचुकल्यासारखें वाटे.

मांजराशिवाय घर अगदीं ओकें वाटूं लागलें.

शेजारच्या कंपाउंडांत एक मांजरी होती. मोठी तेज मांजरी होती ती! पाखरूं किंवा खार पकडण्यासाठी ती झाडावर उड्या मारूं लागली म्हणजे नजर भारून टाकीत असे! एखादा फिरस्ता कुत्रा कंपाउंडांत शिरूं लागला तर तिला पाहून दारांतच थबके! तिची चाल मोठी ऐटदार होती. अंग काळ कुळकुळीत होतें आणि लव मखमलीसारखी मऊ आणि तेजदार दिसे. सकाळच्या कोवळ्या उन्हांत, शेपटी मागच्या पायाखालीं दुमडून पुढल्या एका पायानें आणि जिभेनें ती तोंड साफ करीत बसे तेव्हां तिच्या अंगावर तपकिरी झांक मारे. तिचा चेहरा गुबगुबित, घाटदार, पण थोडासा उग्र दिसे. तिच्या डावीकडच्या ओठावर एक पांढरा ठिपका होता, त्यानें या उग्रपणांत थोडीशी भरच पडली होती.

—आणि तिचे डोळे! दोन हिरवे मणीच! रात्रीं काळोखांत ती पाहूं लागली म्हणजे दोन काजवे चमकत!

ती पाळतां आली असती तर! पण तिला पाळण्याचा विचार मनाला शिवणेंहि शक्य नव्हतें. मनुष्यप्राण्याबद्दल उपजत वैर घेऊनच ती जन्माला आली होती कीं काय न कळे, पण माणसाची चाहूल लागली कीं ती सटकन् पळ काढी. दूर जाऊन रागीट चेहऱ्यानें पहात उभी राही. कोणाच्या घरांत शिरतांना अगर एखाद्या खिडकींतून बाहेर पडतांना तिला मीं कधीं पाहिलें नव्हतें. पहिल्या मजल्यावरची एक बंगाली बाई गॅलरींत उभी राहून दररोज सकाळीं तिच्यासाठी मांसमच्छर टाकी, तेव्हां म्यँव म्यँव करीत आणि शेपटा फुगवून नाचत ती जी तिच्याकडे पाही तेवढीच तिची मानवाबद्दलची आसक्ति दिसली!

अर्थात् तिला पाळण्याची कल्पनाच मनांत आणायला नको होती. पण तिची पोरें सुंदर होतील असें समजायला आधार होता. दोनतीनदां ती व्याली होती. तिच्या भोवती नाचणारीं तिचीं पिलें छान छान वाटलीं होतीं. पण ती कोठें व्याली होती आणि त्या पोरांचें पुढें काय झालें याचा कधीं पत्ता लागला नव्हता. आमच्या कंपाउंडांत ती पोरें घेऊन आल्याचें मीं कधीं पाहिलें नव्हतें. आतां ती गाभण दिसत होती. पण तिचीं पिलें

सहजासहजीं हातीं लागण्याचा मुळींच संभव नव्हता. मोठ्या खटपटीनें एखादें पळविणें कदाचित् शक्य होतें. आतां तिला पिलें झालीं कीं तो प्रयोग करून पाहण्याचा मी निश्चय केला होता.

इतक्यांत एक दिवस सकाळीं ती आमच्या दारांतल्या पारिजातकाखालीं येऊन ओरडूं लागली. अगदीं विव्हळून ओरडत होती. तिच्या पोटांत दुखूं लागलें असावें. मध्येंच ती तिच्या कंपाउंडच्या भिंतीकडे जाऊन वर पहात ओरडूं लागे, मध्येंच ती पारिजातकाखालीं येऊन ओरडे. तिची विण्याची जागा त्या आवारांत असावी, पण आज, आतां, भिंतीवरून उडी मारून जाण्याची ताकद तिच्यांत नसावी. ओरडतां ओरडतां ती जमिनीवर पडून गडबडां लोळूं लागली. एकदम ती इतकी असहाय, अगतिक झाली! तिनें माझ्याकडे लाचार मुद्रेनें पाहिलें. माझ्या मनांत एक विचार आला—नि मीं झटकन् जाऊन तिला उचललें. इतर वेळीं तिला हात लावण्याचें धाडस मला झालें नसतें ( एकदा एकां बोक्याशीं भांडतांना तिनें जबडा कसा वासला होता हें मी विसरलों नव्हतों! ), पण आतां ती अगदी गोगलगाईसारखी गरीब झाली होती. एखादें चिरगूट उचलावें तशी मीं तिला उचलली आणि घरांत आणून पलंगाखाली ठेवलीं.

तिचा ओरडण्याचा आवाज जरा नरम पडला. ओरडतां ओरडतांच तिनें ती जागा इकडे तिकडे दहापांचदां हुंगली, एकदोनदां हवेंतच हुंगलें, माझ्याकडे जरा मृदु नजरेनें पाहिलें—आणि स्वस्थ गप्प झाली. मी समजलों.

अर्ध्या पाऊण तासांत आमच्या पलंगाखालीं तीन डोळे मिटलेल्या जिवांना वाचा फुटली!—मीं पाहिलें, ती मांजरी आपल्या मऊ सैल हातांची पांखर घालून त्यांना चाटीत होती. मला पाहिल्याबरोबर तिनें एक लांबलचक म्यँव केलें—'माझ्या पोरांना इजा करूं नका हं' असें जणु ती मला विनवीत असावी. तिच्या नजरेंत विश्वास आणि अविश्वास, अभिमान आणि लाचारी यांचें मिश्रण आढळलें.

—पण याचा अधिक विचार करण्याच्या मनःस्थितींत मीं नव्हतों. जी मांजरी माझ्या वाऱ्यास उभी राहिली नसती ती माझ्या पलंगाखालीं येऊन व्याली होती याच गोष्टीनें मी अगदीं खूष होऊन गेलों होतों.

आणि पिलें तरी किती सुंदर!—एक तर अगदीं झक होतें! पांढरें, शुभ्र, सफेत! अंगावर खूपशी मऊमऊ मखमली लव — आणि शेपटी कशी झुबकेदार! (नाहींतर बऱ्याचशा मांजरांच्या शेपट्या किती सुकट, सुंभाच्या दोरीसारख्या असतात!) त्याच्या तोंडावर, डाव्या कानाच्या बाजूस दोन काळे ठिपके होते. एकाचें टोक डोळ्यांवर असें कांहीं आलें होतें कीं, डोळे मिटलेले आणि कान तोकडे, न वाढलेले, असून सुद्धां तें अगदीं मिस्किल दिसे! डोळे उघडले आणि कान पुरे वाढले म्हणजे विलायती चित्रांतील मांजराची मिजास तें मागें काढील अशी खात्री वाटली.

पण ती मांजरी या पिलांना येथेंच ठेवील हें कशावरून! व्याल्यावर मांजरी पहिले सात दिवस पिलें सारखीं एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं हालवते हें मला माहित होतें. लहानपणीं एका मांजरीनें चालविलेली ही पिलांची थारेपालट मीं पाहिलेली होती. बोका पिलें खातो म्हणून त्याला हुलकावण्यासाठीं ही धडपड असते असें म्हणतात. आमच्याकडे बोक्याची मुळीच भीति नव्हती. पण मांजरीला हें ठाऊक असेल याची खात्री काय! बोक्याची भीति नाहीं हें कदाचित तिला अनुभवानें कळून येईल, पण आमच्या घराबद्दल तिला आपुलकी वाटली पाहिजे ना! अगतिक होऊन ती आमच्याकडे आली. कांहीं कांहीं बाबतींत मांजरीला सुद्धां स्वाभिमान असतो! तिच्या स्वाभिमानास हें किती दिवस सहन होईल!

स्वाभिमानावर प्रेम हें मोठें प्रभावी औषध आहे. त्या मांजरीला आमच्या घराबद्दल प्रेम वाटूं लागवें म्हणून माझे प्रयत्न सुरू झाले. व्याल्यानंतर जवळजवळ चोवीस तास ती पिलांजवळून उठली नाहीं. तेवढ्या अवधींत तिच्यासमोरची बशी मीं दुधानें सारखी भरलेली ठेवली. समोरच्या बंगाली बाईकडे माशासाठी ती कशी अधाशी नजरेनें पाही तें मीं पाहिलेलें होतें. तिच्यासाठीं (माझा ब्राह्मणाचा धर्म विसरून!) बाजारांतून मासेहि मागविले. खाईल तितके मासे आणि पिईल तितकें दूध तिला देण्याची व्यवस्था केली.

माझ्या तपश्चर्येला फळ येणारशीं लक्षणें दिसूं लागलीं. सात दिवस पिलें हालविण्याचें पुसटसें चिन्हहि तिनें दाखविलें नाहीं. ती बहुतेक पिलां-

जवळ बसून असे. कधीं बाहेर गेली तरी ठराविक वेळीं परत येई. आल्याबरोबर तिच्यापुढें दुधाची वाटी ठेविली जाई. एकीकडे दूध पीत ती पिलांना दूध पाजूं लागली कीं तिच्या चेहऱ्यावर असें कांही बेफिकीर समाधान खेळूं लागे कीं, ही रानवट मांजरी अखेरीस माणसाळली असा विश्वास वाटे. मी आतां पिलांकडे एक प्रकारच्या निर्वास्त आपुलकीनें पाहूं लागलों. त्यांच्या वाढीकडे माझें लक्ष जाऊं लागलें. गुर्रर गुर्रर असा आवाज करीत डोळे मिटून पडलेल्या मांजरीचें दूध तीं पिऊं लागलीं कीं त्यांच्या निसर्गदत्त बुद्धीचा नवनवा विलास दृष्टीस पडूं लागे. आई जवळ नसतांना एकमेकांच्या गळ्यांत गळा घालून घट्ट बिलगून बसलेलीं हीं पिलें दूध पितांना आपल्या भावंडाच्या तोंडांतून आईचा स्तन काढून घेण्यासाठीं एकमेकांना दूर ढकलण्याची कशी पराकाष्ठा सुरू करीत व त्यावेळीं त्यांच्या इवल्याशा पायांत घोरपडीची शक्ति कशी येई तें पाहिलें म्हणजे निसर्ग सुद्धां कधीं कधीं खट्याळ माणसासारखा मिश्किल बनतो हें ध्यानांत येई; आणि आपल्या पोटावर चढून दुधासाठीं भांडणाऱ्या या पोरांचें डोळे किलकिले करून आणि म्यँवचा आवाज काढून ती मांजरी जें कौतुक करी तें पाहिलें म्हणजे निसर्ग माणसांप्रमाणेंच इतर प्राण्यांनाहि नुसती मायाच नव्हे तर तिचा खेळकर ( आणि कधीं कधीं खोडकर ) उपयोग करण्याची बुद्धि दखील देतो याची साक्ष पटे !

आतां ही पिलें आपल्याकडेच राहाणार अशी खात्री वाटूं लागली. यापुढें पांच सहा महिने साक्षात् क्रीडा नाना रूपें धारण करून आपल्या घरांत वावरणार याबद्दल संशय उरला नाहीं. आतां, मिटल्या-अर्धमिटल्या डोळ्यांनीं पिलें पलंगाखालीं पडलेलीं असतांनाच, वाघ आणि चार यांच्या हालचालींचें एकदम स्मरण करून देणाऱ्या पिलांच्या खेळाचे नाना प्रकार माझ्या नजरेसमोर नाचूं लागले. आईच्या शेपटीबरोबर स्वतः शेपट्या फुगवून मारलेल्या उड्या, मागल्या पायावर उभें राहून घेतलेला हल्ल्याचा पवित्रा, आपले इवलाले जबडे पसरून एकमेकांशीं घेतलेली झोंब आणि परस्परांना घातलेले विळखे, काल्पनिक सावजावर झडप घालण्यासाठीं

घसलेला दवा, बागेंतल्या झालणाऱ्या सावल्यांबरोबर केलेली धावाधाव, एकदम जवळ जवळ येऊन पायाला घेतलेला खोटा चावा, शरीराला गोड बांक देऊन पायांना घासलेलें अंग, या लीलांत कधीं दरवेशाशीं खेळणाऱ्या माकडांची तर कधीं वारा खाऊन उड्या मारणाऱ्या शेरडांची प्रतीति येई ! हीं दृश्यें नुसती कल्पनेनें पाहतांपाहतां मी मुग्ध होऊन जाई !

—इतक्यांत, आठव्या दिवशीं मी ऑफिसांतून आल्यावर पाहिलें तों एक पोर कमी ! —जें सुंदर तेंच नाहींसे झालेलें ! मांजरी तेथें नव्हती. बोक्यानें पळविलें कीं काय ? एक शंका मनाला चाटून गेली. पण नाहीं. या सटवीनेंच आपल्या पिलांना येथून हालविण्याचें ठरविलेलें दिसतें. मी तसाच थोडासा विमनस्क होऊन बसलों, तोंच ती मांजरी खिडकींतून आंत आली नि पलंगाखालीं गेली. मी उठून पाहतों तो तिनें दुसऱ्या एका पिलाला मानगुटीला धरून नेण्यास सुरवात केली होती. मला संताप आला. मीं काठी घेतली आणि तिच्या पाठींत एक सपाटा ओढला. तिनें तें पोर तेथेंच टाकलें आणि झपाट्यानें खिडकीतून बाहेर उडी मारली. पण गेली नाहीं. तेथेंच क्रुद्ध स्वरांत ओरडत राहिली. तिच्या आवाजांत जणूं विखार भरला होता. मी बाहेर गेलों—अन् तिला आणखी एक तडाखा दिला. तिनें माझ्याकडे उग्र मुद्रेनें पाहात क्षणार्धांत कंपाउंडच्या भिंतीवर उडी मारली आणि ती पलीकडे गेली. तिचें आग लागलेलें ओरडणें मात्र सारखें सुरू होतें.

उरलेलीं दोन पिलें तरी वांचवावीं म्हणून रात्रीं झोंपेपर्यंत तिला तीनचारदां हांकून लावली. एकदां चांगली झोडपलीहि. ही खटपट फुकट होती हें मी ओळखून होतों आणि उपयोग तरी काय, सुंदर पोर तें तिनें आधींच नेलें होतें ! पण माझ्या हातावर तिनें तुरी दिल्यामुळें मी संतापलों होतों—आणि हीं दोन पोरें ठेवून तिची खोड मोडण्याची जणूं सूडबुद्धि माझ्यांत निर्माण झाली होती. त्या खोलीचीं दारें—खिडक्या बंद करून मी दुसऱ्या खोलींत झोंपलों.

सकाळीं उठल्याबरोबर दार उघडून पलंगाखालीं पाहिलें, तों पोरें

बेपत्ताच ! खिडक्या-दारें बंद केलीं तरी वर ' व्हेंटिलेटर ' होता. त्या तेज मांजरीनें पोरें तेथून नेलीं होतीं !

पोरें नाहींशीं झालीं हें ध्यानांत आल्याबरोबर संतापाची एक तिडिक मस्तकांत उठली. पण या संतापाचा कांहीं उपयोग नाहीं हें लगेच ध्यानांत आलें —आणि कसें तरी विचित्रच, उदास, असहाय वाटायला लागलें.

उद्विग्न चित्तानेंच मी स्वयंपाकघरांत जाऊन चहा पिऊं लागलों, तोंच मांजरीचा आवाज आला. चमकून पाहिलें तो मांजरी येऊन दुधासाठीं ओरडत होती. रोज याच वेळीं मी तिला दूध– चांगलें सायीसकट दूध– थाळीत असें. आज उठलों नि दारामागची काठी घेऊन तिच्या पाठींत चांगला सपाटा घातला. माझ्या काठीखालीं तिची पाठ सपकन् लवली. एक चमत्कारीक चीत्कार करून ती पळून गेली. सपाटा घालण्याचें समाधान मिळाल्यामुळेंच कीं काय माझा संताप थोडा निवाला आणि मन शांत होऊं लागलें.

पण मांजराची जात किती कोडगी असते याची मला कल्पना नव्हती ! दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती दुधासाठीं बिनचूक हजर ! आजहि तिला सपाटाच मिळाला. पण तिसऱ्या दिवशीं पुनः हजर ! चौथ्या व पांचव्या दिवशीं आली नाहीं—पण सहाव्या दिवशीं पुनः आली. आतां मला काठी चालविण्याचा कंटाळा आला होता. ( आणि शिवाय त्याचा उपयोग तरी काय होता ? ) तिच्या चिकाटीवर खूष होऊन कीं काय, माझ्या पत्नीनें तिला थोडें दूध घातलें. त्या आधारावर ती अधुनमधून येऊं लागली– आणि अधुनमधून तिला दूधहि मिळूं लागलें. दूध मटकावलें कीं ती निघून जाई. दुधाच्या लोभानेंहि त्या घरांत स्थायिक होण्याचा तिचा स्वभावच नव्हता !

असेच पंधरा दिवस गेले. एवढ्या अवधींत तिच्या पिलांचा मीं कसून शोध केला. आजुबाजूच्या आवारांतहि जाऊन आलों. गॅलरींत आलों कीं नजर शेजारच्या आवारांत शोध करूं लागे. पण तिच्या गुप्त स्थळाचा भेद मी करूं शकलों नाहीं.

एक दिवस सकाळीं मी चहा पीत असतां ती आली. पंधरा दिवसांत माझा राग बहुतेक ओसरला होता. मी तिच्याकडे लक्ष टाकलें. तिचे फुगलेले स्तन आतां बसले होते. हें साहजिकच होतें. पण पोट फारच सपाट दिसलें. मी एकदम उठलों आणि तिला धरून तिचें पोट न्याहाळून पाहिलें. तिचे स्तन अगदीं सुकेकोरडे दिसले. स्तन तोंडांत मिळावा म्हणून करकचून भांडणारीं पिलें दूध पीत असल्याचें कांहीं लक्षण दिसेना. म्हणजे ! पिलांनीं दूध प्यायचें सोडलें कीं काय ! कीं बोक्यानें पिलें खाल्लीं ! होय बहुधा असेंच ! ' अरेरे ! ' माझ्या तोंडून एकदम उद्गार निघाला.

मीं दुधाची पातेली घेतली आणि तिच्यापुढें दूध ओतलें. पत्नी माझ्याकडे आश्चर्यानें पाहूं लागली. पण माझा सारा राग पळाला होता—आणि त्याची जागा सहानुभूतीनें घेतली होती.

त्यानंतर ती रोज सकाळीं येऊं लागली. रोज मी तिला दूध घालूं लागलों. रोज माझें तिच्या स्तनाकडे लक्ष जाई. ते अगदीं सुके-कोरडे दिसत. तिचे ते सुके—कोरडे खडखडीत स्तन दिसले की तिच्या पिलांची आठवण येई—आणि बोक्यानें त्यांना खाल्लें हा विचार मनाला डसूं लागे. लहानपणीं बोक्यानें अर्धवट खाल्लेलें एक पिलूं माझ्या नजरेस पडलेलें होतें. मांजरीचे ते कोरडे स्तन दृष्टीस पडले कीं, त्या अर्धवट खाल्लेल्या पिलाचें विद्रूप, हिडीस दृश्य डोळ्यांपुढे येई आणि मनांत कालवाकालव होऊं लागे.

इतक्यांत एक दिवस, मी चहा पीत बसलों असतांना, अकस्मात पिलूं ओरडल्याचा आवाज आला. मी चमकून उठलों —आणि कोठें ओरडलें तें पहाण्यास निघालों. तों दारांतच आमची मांजरी येतांना दिसली. तिच्या मागें तिचीं दोन पिलें एकमेकांशीं खेळत येत होतीं आणि तिसरें —तें सुंदर तेंच – तिच्या शेपटीवर उडया मारीत मारीत येत होतें. मीं एकदम त्याला उचलून घेतलें व उराशी धरलें, आणि दुधाची सबंध पातेली मांजरीच्या पुढें ठेवली !

—ऑक्टोबर, १९४७.

# ४ तुळशीचा वाडा

पंधरा सोळा वर्षें झालीं असतील. आम्ही पांच सहा मित्रांनीं परशुरामक्षेत्राची पायीं सफर केली होती तेव्हांची हकीकत—

पहांट फुलण्याच्या सुमारास उठायचें व सकाळीं नऊ दहा वाजण्याच्या सुमारास एकाद्या गांवांतील देवळांत अगर धर्मशाळेंत मुक्काम ठेवायचा, जेवण करायचें, विश्रांति घ्यायची आणि पुन: दिवस परतल्यावर चालू लागून रात्रीं अशाच कोणत्या तरी देवळांत वा धर्मशाळेंत वस्ती करायची, असा आमचा कार्यक्रम होता. आज आम्ही देवरूखहून निघालों आणि दहा वाजण्याच्या सुमारास संगमेश्वरांत आलों.

आमच्या बरोबर विनूतात्या म्हणून आमच्याहून जरा मोठे आणि त्या प्रांताचे माहितगार असे गृहस्थ होते. त्यांच्या सल्ल्याप्रमाणे संगमाजवळच्या कर्णेश्वराच्या देवळांत दुपारचा मुक्काम करायचें आम्ही ठरविलें.

संगमेश्वर ही मराठ्यांच्या काळीं एक फार मोठी गजबजलेली व्यापार पेठ होती हें आम्हांला माहित होतें. आज त्यांतलें वैभव विशेषसें दिसलें नाहीं; पण मधूनच आढळणारा एकाद्या जुन्या बांधकामाचा अवशेष आम्हाला त्याची आठवण करून देई.

आम्ही संगमाजवळ आलों आणि समोरचें दृश्य पाहून आमचे प्रवासाचे श्रम पार हरपले. संगमेश्वरच्या मराठकालीनपणाबद्दलचेहि विचार विसरून गेले.

दोन बाजूंनीं दोन नद्या येऊन तेथें एकमेकींना भेटल्या होत्या आणि आपल्या भेटीचा आनंद त्यांनीं आसमन्तांत उधळला होता.

समोरचा उंच निस्तब्ध डोंगर—नुकत्याच वर आलेल्या सूर्यामुळें त्याचा माथा तेजानें नाहत होता. उजवीकडे नदीच्या कांठावरची ओथंबलेली झाडी आणि त्यांतून या फांदीवरनं त्या फांदीवर उडणारे पक्षी—त्यांच्या प्रतिबिंबानें खालच्या जलाशयाच्या सखोलतेंत एक प्रकारची गूढ भर पडली होती. उजव्या हाताचें कर्णेश्वराचें देऊळ—त्यात सकाळींच देवदर्शनास आलेल्या कोणा भक्तानें वाजविलेल्या घंटेच्या प्रसन्न नादानें तेथली पवित्रता जाणवत होती. आणि डाव्या बाजूला टेकडीच्या अलीकडेच एकत्र होऊन खोलांत वाहणारें नद्यांचें पाणी—त्याच्या खळखळ आवाजामुळें तेथली सगळी शांतता एकवटून निघाली होती.

माझी नजर त्या नद्यांचा वेध घेऊं लागली; पण ती फार दूरवर पोहोंचत नव्हती. उजवीकडची नदी कांठावरच्या वृक्षराजीच्या आड गली होती आणि डावीकडची टेकडीच्या आड दिसेनाशी झाली. कोठून आल्या या नद्या! आणि कोणत्या ऋणानुबंधानें त्या येथें एकमेकींना भेटल्या — भेटल्या नव्हे, एकमेकींत मिसळून गेल्या!

त्यांच्या संगमाच्या मधोमध एक लहानसें, काळ्या दगडांनीं बांधलेलें देऊळ होतें. हेंच संगमेश्वराचें देऊळ. देवळाच्या चारी बाजूंनीं नदीचें पाणी शांत प्रसन्नतेने वाहत होतें आणि त्याच्यावर सूर्याचे किरण चमकत होते. — जणु कोणा कर्मयोगिनीच्या अर्घ्यजलावर तिच्या तपस्येचें तेजच पसरलें होतें!

आणि त्या देवळाच्या सभोंवतीं सगळीकडे दिसणारे काळे भस्मवर्णीय पाषाण!—संगमेश्वराची आराधना करण्यासाठीं ध्यान लावून बसलेले तपोनिधीच! एखादा बगळा येई, त्यांच्यावर बसे आणि त्यांचा तपोभंग करण्याचा प्रयत्न करी; पण त्यांच्या प्रभावानें तोच उलट ध्यानस्थ बने!

अधूनमधून लव्हाळ्यांचे पुंज होते. तेहि कोणी दर्भधारी भक्तच भासत! आम्ही बराच वेळ त्या दृश्याकडे नुसते पाहत राहिलों. इतक्यांत आमच्या

भोंवतीं बागळ्याची पांच सहा पोरें जमा झालीं. त्यांतला एक जरासा धीट आणि जाणता होता. त्यानें " बसून आलांव ! " असा आम्हांला प्रश्न केला. आम्हीं त्याला कांहीं तरी उत्तर दिलें आणि कर्णेश्वराच्या देवळांत मुक्कामाला आलों.

जरा वेळानें आम्हीं नदींत जाऊन स्नान केलें, स्वयंपाक केला, जेवण आटोपलें आणि आडवें होण्याची पूर्वतयारी म्हणून पत्त्यांचा डाव मांडला.

डाव अगदीं रंगांत आला होता — तोंच आमच्या कानांवर कसल्या तरी भांडणाचा आवाज आला.

आम्ही नीट ऐकूं लागलों. तें भांडण नव्हतें. कोणी तरी संतापून तोंडावाटें शिव्या सांडीत होता.

" आम्ही काय मेलों कीं काय ? " त्या शिव्या आमच्या कानांत शिरूं लागल्या, " आमचं काय निसंतान झालं ! काय आमच्या गांवावर लांवसटीचा फेरा आला ! गांवाचं तळपट झालं कीं काय ? "

काय झालें तरी काय, म्हणून आम्हीं एकदम उठून पाहूं लागलों—

तों एक गृहस्थ — उघडाबंब—उंचापुरा—स्थूल बांध्याचा—लांबटगोल चेहरा— आणि गुबगुबित मिशा ! —

—डोक्याला गुंडाळलेला एक मांजरपाटी रुमाल आणि गुढग्यापर्यंत पोहोंचणारा एक पंचा यांखेरीज त्याच्या अंगावर वस्त्र नव्हते. एक जाड ठसठशीत जानवें त्याच्या देहावर रुळत होतें. पायांत लाल मातीनें भरलेल्या भक्यामक्कम वाहाणा होत्या आणि हातांत बांबूची काठी —

एकीकडे तोंडानें तो अग्निवर्षाव चालू असतांना हातांतली काठी तो पायाखालच्या दगडाळ जमिनीवर जोरजोरानें आपटीत होता !

वरून ऊन ओतत होतें आणि त्याच्या प्रकाशांत त्याचें अंग तळपत होतें.

क्षणभरांत तो देवळाच्या कोपऱ्याजवळ येऊन उभा राहिला. आम्हीं सारे उभे राहून देवळाच्या उघड्या कट्ट्यावरून पाहूं लागलों. सकाळींच कोणीं तरी शेकोटी पेटवली होती, तिच्या राखेपाशीं तो उभा होता आणि

आमच्याकडे क्रुद्ध मुद्रेनं पाहत होता.

"कोण हवं तुम्हाला?" विनूतात्यांनी जरा भीतभीतच विचारलें.

"कोण हवं? — तुम्ही हवेत, तुम्हीच!" त्या गृहस्थाच्या आवाजांतली धार आतां किंचित् कमी उग्र होती, "कुठून आलांत तुम्ही? आणि येथें कां उतरलांत? ही काय रीत झाली? आम्ही गांवांत असतांना ब्राह्मणांनी असं भोरप्यांप्रमाणं बाहेर उतरावं अन् स्वत: जेवण करून जेवावं म्हणजे काय? —चांगली शोभा केलीत आमची!"

"अहो, पण आम्हाला काय माहित? आम्ही आपले पांथस्थ—" विनूतात्या चांचरत उत्तरले.

"माहित नाहीं? या गांवांत हरिकाका सरदेसायाचं नांव तुम्हांला माहित नाहीं? कुठून आलांत तुम्ही?"

विनूतात्यांनीं त्यांना सांगितलें. विनूतात्या आमच्या गांवचे खोत आणि पोलिसपाटील होते. त्यांनीं थोडयाशा संकोचलेल्या आवाजांत आपण कोण, काय हें सांगितल्याबरोबर हरिकाकाच्या चेहऱ्यावर थोडी सौम्यता पसरली—त्यांत थोडी आदराची झांक आली—त्यांचा चेहरा बदलला.

"मज आतांच गडयानं सांगितलंन् — कर्णेश्वराच्या देवळांत कोणी बामन पाव्हने उतरल हायत आन् जेवन करून जेवताहत, म्हणून. मी आंघोळीला निघालों होतों तसंच पायतण चढविल नि निघालों. बरं तर आतां असं करा —"

आम्ही सारे प्रश्नार्थक चेहरे करून पाहू लागलों.

"मजबरोबर चला—अन् पंक्तीला चार घास खा."

आम्ही थंड झालों—थोडेसे भेदरलोंच. आमचें जेवण नुकतेंच झालें होतें. सकाळींच दहाबारा मैलांची मजल मारून आलेले आम्ही—आमचें शरीर थकलें होतें. डोळयांत झोंप उतरली होती.

आतां यांच्याकडे जाऊन जेवायचं? —म्हणजे मरणच!

"छे बुवा—शक्य नाहीं—" आम्ही दोघेतिघे स्वत:शींच पुटपुटलों.

विनूतात्यांनीं त्यांना आमची असमर्थता सांगितली.

"ठीक आहे" हरिकाका उत्तरले, "पण आमच्याकडे एक वेळ अन्नग्रहण केल्याखेरीज तुम्हाला गांवाबाहेर पाऊल टाकतां येणार नाहीं हें लक्षांत ठेवा. आज रात्रीं तुमचा आमच्याकडे मुक्काम—"

"नाहीं पण, आज आम्हाला गेलंच पाहिजे" विनूतात्या त्यांना आग्रहानें सांगूं लागले. "आम्हाला आमचा प्रवास आटपून लवकर परतलं पाहिजे. घरीं पुष्कळ कामं अडून—"

"आणि आम्ही काय रिकामटेकडे आहोंत?" हरिकाकांनीं एकदम विचारलें. त्यांच्या आवाजांत अधिकार, करारीपणा आणि खानदानी आपुलकी यांचें मिश्रण होतें.

त्यांचा तो रुबाब मोठा भेदक होता!

"तें कांहीं नाहीं—आतांच्या आतां चला. गण्या—" इतक्यांतच तेथें येऊन उभा राहिलेल्या गड्याला हांक मारून ते म्हणाले, "चल रे, उचल यांचं सामान नि घेऊन ये यांना. मी पुढं जातों—उशिर झाला."

एवढें बोलून तो म्हातारा पाठ फिरवून चालूंहि लागला!

—आणि आम्ही भरलेल्या पोटानें, थकलेल्या पावलानें आणि पेंगलेल्या शरीरानें, भर दोन प्रहरीं, मैल दीड मैलाचें अंतर चालून—निदान तें तितकें आम्हाला भासलें—हरिकाकांच्या घरीं गेलों

तें घर म्हणजे काय? एक मोठा वाडाच, किंवा एखाद्या जुनाट चौसोपी वाड्याचें एक पाखें! जवळ गेल्यावर त्याचें पुरुषभर उंचीचें जोतें दृष्टीस पडलें, त्याला मधुनमधून लोखंडाचीं कडीं बसविलेलीं होतीं—आणि त्यांच्यावर चढलेल्या गजावरून त्यांच्या जुनाटपणाची कल्पना येत होती.

वाडा दुमजली होता—माडीच्या गच्चींत जुनीं लांकडें, मोडके माचे, भाताच्या टोपल्या वगैरे अडगळ ठेवलेली होती. वाड्याच्या छपरावरचें कौलार बऱ्याच वर्षांत परतलेलें नसावें. एका कोपऱ्यांत तें घसरलें होतें आणि इतरत्र त्याच्यावर मधुनमधून गवत वाढलें होतें. वाड्यावर दक्षिणेकडील आंब्याची एक जुनाट वाडगुळलेली फांदी आली होती, तिचा

बराचसा पातेरा कौलारावर जमा झाला होता.

एखादें कित्येक वर्षांत अवर्दळलेलें, कुंद, नीरव, ऐतिहासिक ठिकाण पाहिल्यावर जसें वाटतें तसें कांहींसें त्या वाड्याचें दर्शन झाल्याबरोबर वाटलें.

वाड्यांत प्रवेश केल्याबरोबर ध्यानांत आलें कीं, त्याच्या मागच्या बाजूनें आणखी एक पाखें उभें आहे. त्यांत अंत:पुर असावें. त्या पाख्याची उत्तरेकडची खोली अगदीं बंद होती आणि तिचें छप्पर मोडकळीस आलें होतें. एखाद्या गवताच्या वरंडींतली पेंडी बाहेर येऊन गळूं लागावी तसे त्याचे दोनतीन वासे बाहेर आले होते.

वाड्याचें लांकूडसामान सारें काळ्या रंगाचें होतें—तें शिसवी होतें कीं जुनाटपणामुळें काळें झालें होतें हें मात्र नीटसें ध्यानांत आलें नाहीं. मधुनमधून खिडकीला एखादें नवें झडप, अगर दरवाज्याच्या चौकटीला नवी बाजू, अशी कांहीं दुरुस्ती केलेली होती तेवढ्यापुरतें तें निराळें, फणसाच्या नाहींतर सागवानाच्या रंगाचें दिसे. भिंतींना कित्येक वर्षांपूर्वी दिलेला आणि कोंकणच्या खेड्यांत सहसा न दिसणारा असा पिवळा—पिवडीचा—रंग दिलेला होता. तक्तपोशीच्या वारांना दोन हंड्या लोंबत होत्या, त्यांतल्या एकीला तडा गेला होता. भिंतीवरच्या वारांना, ' महाघोर संसारशत्रू जिणावा ', ' सुखानंद आनन्द भेदें बुडाला, ' ' परी शेवटीं काळ घेऊनि गेला ' अशा वेलबुट्टीदार सतवचनांचे शिळाप्रेसवर छापलेले कागद चिकटविलेले होते आणि ते जीर्ण होऊन विटल्यामुळें त्या वारांच्या रंगाशीं समरस होऊं पाहत होते. त्या वारांवर, दोनतीन ऐतिहासिक पुरुषांच्या कीं पूर्वजांच्या जुन्या, चेहऱ्याची एकच बाजू दाखविणाऱ्या, तसबिरा टांगलेल्या होत्या.—त्यांच्या फ्रेमवरची नक्षी उडून गेली होती आणि आंतला चित्रांचा कागदहि कोपऱ्याकोपऱ्यांनीं झडून चालला होता. —त्यांतली एक, मराठेशाहींतल्या कोणा पुरुषाची, बंदुकीचा नेम धरीत असतांनाची, मीं पूर्वी कोठें तरी पाहिली असावीसें वाटलें, पण नक्की कोणाची तें ध्यानांत येईना. खालच्या बाजूस भिंतीशींच एक मोठें जुनाट तरट टाकलेलें होतें आणि त्याच्यावर भिंतीला टेकून दोन मकळट लोड ठेवलेले होते.

आम्हीं घरांत शिरलों तेव्हां आंतून–देवघरांतून–हरिकाकांचा पूजा म्हणत असलेला आवाज ऐकूं येत होता. आम्ही हातपाय धुवून तरटावर बसतों तोंच ते सोवळ्यानें दारांत डोकावले. तोंडानें मंत्र म्हणतां म्हणतांच ते बोलले,

" बसा. आमच्याकडे कोणी आलं म्हणजे आम्हाला कसं बरं वाटतं! आमचं हें घर मोठं इतिहासप्रसिद्ध आहे, बरं का. संभाजीमहाराजांनीं तुळशीबाईना ठेवल होतं तोच हा वाडा!"

" खरं कीं काय?" विनूतात्यांनीं विचारलें.

" अहो, खरं म्हणून काय विचारतां! महाराजांना मालवणला तुळशीबाई सांपडल्याबरोबर त्यांनीं हा वाडा बांधण्याचा हुकूम दिला आणि वाडा बांधून झाल्याबरोबर तुळशीबाईना इथं आणून ठेवल. त्यांनीं कांहीं त्यांना रायगडला नेलं नाहीं. महाराज कितीहि विलासी असले तरी एवढा पाचपोंच होता त्यांना."

माझी नजर एकदम दारावरच्या तसबिरीकडे गेली. बंदुकीचा नेम धरीत असतांनाचें तें चित्र संभाजी महाराजांचेंच हें माझ्या ध्यानांत आलें. माझी नजर झटकन् वाड्याभर फिरली. एका काळच्या या विलासी वाड्यावर आज कोण ही अवकळा आली! पण हा विचार फार वेळ टिकला नाहीं. संभाजीला याच वाड्यांत औरंगजेबाच्या काळदूतांनीं गिरफदार केलें, याच विचारानें माझें मन व्यग्र झालें. तुळशीच्या महालांत इष्क आणि शराब यांच्या कैफांत संभाजी स्वतःला, स्वतःच्या कर्तव्याला, स्वतःच्या सुरक्षिततेलाहि विसरला!— त्याच्या तेव्हांच्या अधःपाताचें आणि अगतिकतेचें केंविलवाणें चित्र माझ्या मनासमोर उभें राहिलें.

—नकळतच या चित्राची समोरच्या बंदुकीचा नेम धरणाऱ्या ऐटबाज चित्राशीं तुलना होऊं लागली!

माझें मन उद्वेगानें भरून गेलें!

पण शरीर अतिशय थकलें होतें. मी आडवा झालों आणि क्षणभरांत माझा डोळा लागला. इतक्यांत एकदम हरिकाकांचा आवाज ऐकला आणि

जागा झालों. हरिकाका सांगत होते,

" आतां चहा होतो आहे, तंवर आपण संभाजीमहाराजांना पकडलं तें देऊळ पाहून येऊं या. "

मी एकदम उठून बसलों आणि त्यांना विचारलें,

" पण संभाजीला याच वाड्यांत पकडलं ना ? "

" छे हो ! तो तुमच्या साहेबांनीं लिहिलेला इतिहास ! " हरिकाका गरजले, " संभाजी महाराजांना देवळांत पूजा करीत असतांना पकडलं. मोठा धर्मनिष्ठ पुरुष तो ! औरंगझेबानें त्याचे डोळे काढले, जीभ कापली–सबंध अंग सोलून काढलें ; पण बहाद्दरानं धर्म बदलण्याचं कबूल केलं नाहीं !—हें माहीत नाहीं तुम्हाला ? "

बोलतां बोलतां हरिकाकांचा चेहरा लाल झाला. आवाजांत स्फुरण आलें. थोडा वेळ ते थांबले आणि नंतर म्हणाले,

" संभाजीला रंगमहालांत दारूच्या धुंदींत पकडलं, वगैरे साऱ्या गोष्टी म्हणजे नुसत्या थापा आहेत. महाराज पूजेंत मग्न असतांना त्यांना पकडलं हें आमच्या रियासतकारांनीं साफ सिद्ध केलं आहे —"

माझ्या मनांत एकदम विचार आला. हे हरिकाका आणि रियासतकार एकाच घराण्यांतले असावेत.

—हरिकाका बोलतच होते,

" महाराज असे बेसावध होते म्हणून ! नाहीं तर सिंहाचा छावा तो ! काय माया व्याली होती त्यांना पकडण्याची ? "

आम्ही उठलों आणि त्यांच्या बरोबर जावयास सिद्ध झालों. कोठें दूर जायचं नव्हतं. वाड्याच्या उत्तरेस, हरिकाकांच्या परसंदाच्या खालच्या बाजूसच एक मोठं थोरलें आवार होतें—त्यांतच हें देऊळ होतें.

आम्ही पाहिलें. आवाराची साफसफाई नवथर काळांत झालेली नसावी. त्यांत जिकडे तिकडे रान माजलें होतें आणि त्यावर पातेरा गोळा झाला होता. आवाराचा गडगा मधूनमधून कोसळला होता आणि दगडाच्या फटींतून गवत उगवलेलें होतें. आवारांत जिकडेतिकडे लहानमोठीं

सागवानाचीं झाडें होतीं. कवळतोडीमुळें आणि पानगळीमुळें तीं उघडीं-बोडकीं दिसत होतीं. आवारांत ठिकठिकाणीं पसरलेल्या लहानमोठ्या घुमट्या आणि त्यांच्या आजूबाजूनें उभे असलेले हे वृक्ष !—मराठेशाहींतले शिपाई-बीरच भालेबरच्या धारण करून या घुमट्यांचें रक्षण करण्यासाठीं सज्ज आहेत असें वाटलें !

इतक्यांत हरिकाकांनीं आम्हाला एका देवळासमोर आणलें. देऊळ कसलें तें ! एक लहानशी घुमटीच ! एका वेळीं एकाहून अधिक माणसांना कांहीं आंत शिरतां आलें नसतें. इतर घुमट्यांप्रमाणें या घुमटीचेहि कांहीं दगड कोसळलेले होते. पण ती झाडून-वेणून स्वच्छ ठेवलेली दिसली. घुमटीच्या आंतील पिंडीची पूजा केलेली होती. घुमटीच्या मागेंच एक भलें थोरलें बेलाचें झाड होतें. त्याच्यावर फारशी पानें नव्हतीं. कांट्यांनीं भरलेल्या त्याच्या फांद्या मला आतां बरा विचित्रच वाटल्या.

" याच मंदिरांत पूजा करीत असतांना त्या चांडाळांनीं महाराजांना पकडलं. " हरिकाका म्हणाले. त्यांचा आवाज रुद्ध झाला होता.

मराठी इतिहासांतली ती भीषण शोककथा माझ्या नजरेसमोर उभी राहिली. ही घुमटी तिला साक्ष होती. माझ्या मनांत एक विचित्र विचार आला. मराठी रियासतीभोंवतीं जागत्या डोळ्यांनीं पहारा करीत असलेल्या पंचदेवता त्यावेळीं कोठें होत्या ? त्यांतली एखादी आतां येथें असेल का ? माझी दृष्टि चोहोंबाजूस फिरली. संभाजीच्या त्या भयाण शेवटानंतर मराठेशाहीवर आलेली अवकळा आवारभर पसरली होती !

आम्ही परत आलों आणि चहा घेतला.

चहा घेतल्यावर, ' गांव पाहायला जाऊ या, ' असें आमच्यापैकीं एकानें सुचविलें.

" मग चैतन्येश्वराच्या दर्शनालाच चला ना " हरिकाकांनीं सुचविलें, व दक्षिणेकडे हात दाखवून ते म्हणाले, " हा डोंगर दिसतो ना, याचं नांव चैतन्येश्वराचा डोंगर. याच्यावर चैतन्येश्वराचं देऊळ आहे. मोठं रम्य स्थान आहे. येत असलांत तर चला. "

आम्ही निघालों. डोंगर चांगला उंच होता. पण मधुनमधून त्याला पायऱ्या होत्या. त्या फार जुन्या दिसल्या. कोणी बांधल्या असतील, असा एकानें प्रश्न काढला. त्याबरोबर हरिकाका म्हणाले,

" अहो, कुणी बांधल्या हें काय विचारतां ? संभाजीराजांनींच बांधल्या त्या. संभाजीराज मोठे शंकरभक्त होते ना ? ते रोज सायंकाळीं चैतन्येश्वराच्या दर्शनाला जात असत. बरोबर तुळशीबाईना घेऊन जात. त्यांचा मेणा न्यायला सोपं जावं म्हणून या मधुनमधून पायऱ्या बांधून घेतल्या त्यांनीं. ते स्वतः अर्थात् घोड्यावरून जात. "

तो डोंगर चढतांना लवकरच चांगला दम लागला. आमचें बोलणं जवळजवळ बंद पडलें. जरा वर गेल्यावर आम्हीं थोडी विश्रांति घेण्यासाठीं थांबलों. आणि मागें वळून पाहिले, मागें सायंकाळच्या सूर्यप्रकाशानें रंगलेल्या सृष्टीचें सुंदर दृश्य पसरलें होतें. टेकडीच्या बाजूनें गेलेल्या नदीचीं वाकडीतिकडीं वळणें आतां दिसत होतीं. —इतिहासाचा प्रवाह कसा वाहतो हेंच जणु तीं आम्हांला दाखवीत होतीं. कांहीं ठिकाणीं टेकडीची छाया नदीच्या प्रवाहावर पडली होती आणि तेथले पाणी काळें विषण्ण दिसत होतें. कांहीं ठिकाणीं सूर्याचे किरण प्रवाहावर चकाकत होते.—ती चकाकी डोळ्यांना दिपवीत होती- मधुनमधून पाण्याचे डोह दिसत. निळ्या तांबड्या आकाशाच्या प्रतिबिंबामुळें त्यांतून स्वप्नसृष्टीच फुलली आहे असें वाटे. उजवीकडच्या डोंगरावर कांहीं लोक झाडावर चढून कवळ तोडीत होते. त्यांच्या कोयत्यांची फांद्यावर घाव घालणारीं पातीं सूर्याच्या प्रकाशांत चकाकत होती. पलीकडेच एक धान्याची मळणी चालली होती. आणि त्याच्या पलीकड कांहीं गुरें डोंगरबाजूवर चारा हुडकीत फिरत होतीं. कोंकणांत युगान्‌युगें चाललेल्या जीवनाचें तें सारें एक दर्शनच होतें. त्या डोंगराच्या मागें सह्याद्रीच्या नीलधूसर रांगा उभ्या होत्या—त्यांच्या रूपानें जणु कालच कोंकणचा जीवनक्रम पाहात होता !

" ती पाहिलीत का समोरची राई ? " हरिकाका हातांतल्या काठीनें समोरच्या टेकडीकडे दाखवीत सांगू लागले —

आम्ही सारे पाहूं लागलों —

समोर टेकडीवर एक प्रचंड राई होती. रानवेली आणि रानवृक्ष यांची तिच्यांत एकच गर्दी उसळली होती. मधुनमधून एखादा ताडमाड वाढलेला वृक्ष आपला माथा दाखवीत होता. कधींहि कुऱ्हाडीचा अगर कोयतीचा स्पर्श न झालेल्या त्या राईवर वठलेल्या जुनवटपणाची कळा पसरली होती. राई गर्द होती, पण त्यांतूनच एक कौंवळी झोपटाचा थोडासा भाग दिसत होता. तें गांवदेवीचे देऊळ असावें.

" राईच्या आंत तें देऊळ दिसतं आहे ना, त्याला तुळसाईचं देऊळ म्हणतात " हरिकाका सांगत होते, " तुळशीबाईची या देवीवर फारच भक्ति, म्हणून लोक तिला तुळसाईच म्हणूं लागले —"

" कधी ऐकलं नव्हतं बुवा " मी म्हटलें.

" अहो, या गांवकऱ्यांच्या समजुती. बाहेर कशाला जातील ? —" हरिकाका उत्तरले.

" तस नव्हे. तुळशी ईश्वरभक्त होती हें ऐकलं नव्हतं मी. बोलून-चालून संभाजीची राख ती. खालीखुशाली, चैन एवढंच तिला माहित ! " मी म्हणालों.

" छे हो !" हरिकाका जरा आवेगानें उद्गारले, " याहि साहेबांनीं रचलेल्या भाकडकथा ! आतां तुळशीबाई नवऱ्याला सोडून येऊन संभाजी महाराजांपाशीं राहल्या — पण त्यांचा नवराच नामर्द होता ! महाराजांच्या बाबतींत त्यांची वागणूक लख्ख पतिव्रतेसारखी होती. आमच्या गांवांत तिच्या पातिव्रत्याच्या आणि धर्मनिष्ठणाच्या कितीतरी गोष्टी ऐकूं येतील तुम्हांला. "

हरिकाकांचा आवाज बोलतां बोलतां बराच चढला. त्यातली निष्ठा निर्विवाद होती. पण माझ्या पूर्वग्रहदूषित मनाला तुळशीची ही स्तुति जरा कशीशीच वाटली.

जरा वेळानें आम्हीं चैतन्येश्वराच्या मंदिरापाशीं आलों. मंदिराभोंवतीं गर्द झाडी होती. फक्त आम्हीं आवारांत शिरलों त्या बाजूला थोडी उघाड होती. आंत आल्याबरोबर तेथल्या नीरव शांततेचा एकदम साक्षात्कार झाला. मंदिर डोंगराच्या उतरणीवर, त्याची बाजू खोदून बांधलेलें होतें.

आवारालगतचीं झाडें आणि फुलझाडें अगदीं स्तब्ध होतीं. डोंगर-माथ्यावरच्या वृक्षांचे शेंडे हालत होते, पण त्यामुळें ही स्तब्धता अधिकच जाणवत होती. मंदिराच्या समोरच एक लहानसा आंब्याचा रोपा होता. तो नुकताच मोहरला होता आणि त्याचा मंद सुगंध सगळीकडे दरवळला होता. त्याच्या शेजारींच एक सावरबांमाचें झाड होतें. त्याच्या-वरचे तकतकित बांभ ओढ लावीत होते. मंदिराच्या समोरच एक लहानशी झरी होती. तिचें पाणी किती नितळ स्वच्छ होतें ! त्या मंदिराभोंवतालची सारी पवित्रता आणि प्रसन्नता जणुं त्या पाण्यांत जमा झाली होती ! एकाग्र अंतर्ज्ञानी तपस्व्याच्या दृष्टीला सृष्टीचा तळ दिसत असेल तसा त्या झरीचा आम्हाला दिसत होता. गर्द झाडीमुळें तेथें सूर्यप्रकाश नव्हता, पण सूर्याचा एक किरण त्या झाडींतून वाट काढीत येऊन झरीच्या पाण्यांत शिरला होता. जणुं कोणी देवदूतच सायंकाळच्या पूजेसाठीं उपस्थित होऊन शुचिर्भूत होण्यासाठीं स्नान करीत होता ! त्या झरींत किती तरी लहान लहान मासे आपलें विलोल नृत्य करीत होते. त्यांनीं आपलें एक निराळें विश्वच निर्माण केलें होतें आणि प्रत्येक मासा त्या विश्वांतल्या ग्रहगोला-सारखा भासत होता ! त्या सूर्यकिरणामुळेंच आपल्या विश्वाशीं या विश्वाचा संबंध असला तर असेल ! बाकी आमच्या जगाशीं त्याचा कांहींच संबंध नव्हता. आम्हीं या ग्रहगोलांचें भ्रमण पाहात बसलों आणि स्वतःला विसरलों. भूत आणि भविष्य यांची जाणीवच उरली नाहीं. फक्त वर्तमानाचे क्षण तेवढे उरले होते ! चिरवर्तमानाच्या अमरलोकांतच आम्हीं जणुं प्रवेश केला होता. त्यांतच आम्ही दंग होतों. इतक्यांत हरिकाकांच्या हांकेनें आम्ही भानावर आलों. ते आम्हांला देवळांत बोलावीत होते. आम्ही गेलों. आंत गेल्याबरोबर तेल–कापराचा कुंद दर्प आमच्या नाकांत शिरला. देवळांत थोडाबहुत अंधारच होता. पण पिंडीजवळ एक समई तेवत होती, तिनें गाभारा उजळला होता. चैतन्येश्वराला आम्ही भक्तिभावानें नमस्कार केला. इतक्यांत हरिकाकांनीं आम्हांला हांक मारली आणि देवळाच्या उत्तरेकडच्या भिंतीला एक एक चिंचोळें छिद्र होतें त्यांतून पाहायला सांगि-तलें. आम्ही पाहिलें. त्या छिद्रांतून बरोबर समोरच्या देवराईतल्या

तुळसाईच्या देवळाचें दर्शन होत होतें.

"तुळशीबाईनीं हें छिद्र मुद्दाम पाडून घेतलं होतं" हरिकाका खुलासा करूं लागले, "तुळशीबाई रोज संभाजीमहाराजांबरोबर वैतन्येश्वराच्या दर्शनाला येत खऱ्या, पण त्यांची खरी भक्ति तुळसाईवर. त्या येथें उभ्या राहात आणि तुळसाईचं दर्शन घेत."

बाहेरच्या मावळत्या प्रकाशाचा एक स्रोत या छिद्रांतून आंत आला होता आणि समोरच्या भिंतीवर पडला होता. मी पाहिलें. तो एका तसबिरीवर पडला होता. खालीं हरिकाकांच्या वाड्यांत संभाजीच्या ज्या चित्राची तसबीर दुपारीं मी पाहिली होती त्याच चित्राची हीहि होती!—

माझें मन संभाजी आणि तुळशी यांच्या अद्भुतरम्य संसाराविषयींच्या विचारांनीं भरून गेलें. कोठें तो थोर छत्रपति संभाजी आणि कोठें ती एका यःकश्चित् तांडेलाची बायको, तुळशी! पण त्यांचीं मनें जुळलीं—आणि त्यांच्या सहजीवनावर प्रणयाची मादक सुषमा पसरली! केवढें आश्चर्य!

माझें मन विचार करूं लागलें—संभाजी केवढा कडवा शंकरभक्त! अवरंगजेबानें जिवंतपणीं अंगाचें कातडें सोललें, पण त्याची भक्ति लवमात्र चळली नाहीं! शंकर म्हणजे वैराग्याची अधिष्ठात्री देवता—तिच्या अचल भक्ताच्या आयुष्यावर प्रणयाची विपरीत पकड बसावी, कामान्तकाचा एकनिष्ठ भक्त कामपीडित असावा, हें विचित्रच नाहीं कां?

पण माझेंच मन उत्तर देऊं लागलें—स्वतः शंकरच नाहीं का एका भिल्लीणीच्या उन्मादक दर्शनानें काममोहित झाले? मग संभाजी तर काय, विकारांच्या आधीन असलेला एक मर्त्य जीव!

एकदम संभाजीच्या भीषण शेवटाचीं भयानक दृश्यें माझ्या नजरेसमोर उभीं राहिलीं—आणि मन सुन्न होऊन गेलें!

परत हरिकाकांच्या वाड्यापाशीं केव्हां आलों हें समजलेंच नाहीं. वाड्यांत पाऊल टाकतांना माझ्या मनांत विचार आला, हा तुळशीचा वाडा हरिकाकांच्या घराण्यांत कसा आला? हरिकाकांनाच विचारावेंसें वाटलें. पण हा खासगी प्रश्न विचारण्याचें धाडस मला झालें नाहीं.

पण त्या रात्रीं हा प्रश्न माझ्या मनांत मधूनमधून डवळत मात्र राहिला.

सकाळीं आम्ही निघालों तेव्हां नीटसें उजाडलें नव्हतें. वाड्याच्या बाहेर आल्याबरोबर माझी नजर आवाराकडे वळली. दिशा फांकू लागल्या होत्या आणि सागवानांच्या झाडांचे शेंडे किंचितसे उजळू लागले होते. पण एकंदर आवारावर अद्याप रात्रीची श्यामल तंद्री होती, आणि त्या अस्पष्ट संधिप्रकाशांत तें आवार एखाद्या अर्धस्मृत स्वप्नदृश्याप्रमाणें भासत होतें.

हरिकाका आम्हांला पोंचवायला निघाले. आम्ही दाराबाहेर पडलों. तेव्हां त्या आंब्याच्या झाडावरील एकदोन पक्षी ओरडत ओरडत उडाले आणि त्याच झाडांत शिरून गप्प झाले! हवेंत थंडी होती आणि आम्ही हात आंखडून घेऊन न बोलतांच चाललों होतों. बरेंसें अंतर गेल्यावर मी मागें वळून पाहिलें. आतां थोडें अधिक दिसूं लागलें होतें. आंब्याच्या झाडामधून हरिकाकांच्या वाड्याचें मागच्या बाजूचें छप्पर दिसत होतें. त्याच्यावर एका कोपऱ्यांत नळाऐवजीं केंबळा होता.

बाजारपेठेच्या जवळपास आलों तेव्हां आम्हांला एक पठाण दिसला. त्याचा तो विरळ दाढीमिशांचा क्रूर चेहरा आणि सुरमा घातलेल्या डोळ्यांतली खुनी नजर! संभाजीला पकडायला आलेल्या काळदूतांचा विचार एकदम माझ्या मनांत आला. हा त्यांचाच कोणी वंशज असेल का? या गांवावर त्यांचे पाश अद्याप कायम आहेत?

त्या पठाणाची स्मृति माझ्या मनांत रेंगाळत असतांनाच, समोर नदी दिसली. काल जिच्या पवित्र संगमाचें दर्शन झालें होतें तीच ही नदी हें मी क्षणांत ओळखलें. पण आतां तिची एक लहानशी खाडी बनली होती. खाडींत एक मचवा उभा होता. क्षितिजावर येऊं लागलेल्या सूर्याचीं तांबूस किरणें त्याच्या शिडावर पसरलीं होतीं. मी हरिकाकांना विचारलें,

"समुद्रांतून मचवे या नदींत इतके आंत येतात?"

"हो, भरतीच्या वेळीं येतात–" हरिकाका उत्तरले, "–आणि भरतीच्याच वेळीं जातात. संगमेश्वरचा बराचसा व्यापार याच मार्गानें चालतो."

आम्हीं पाहिलें, मचव्यांत माल भरलेला होता; रात्रीं भरतीच्या वेळीं तो

आला असावा. आतां भरती पूर्ण ओसरली होती आणि मचव्याचा पुढचा भाग पुळणींत रुतलेला होता. भरतीचे संस्कार पुळणीवर झाले होते आणि तिच्यांत चर पाडून नदीचें पाणी वाहत होतें. बाजूच्या पुळणीवर भरती-बरोबर आलेल्या पाण्याचीं डबकीं सांचलीं होतीं आणि त्यांच्या कांठांनीं घाण जमा झाली होती. नदीच्या पाण्याची स्वच्छता यामुळें विशेष जाणवत होती.

हरिकाका नदीच्या वाहत्या पाण्याकडे पाहत होते. पाहतां पाहतां त्यांचा चेहरा उमलला. ते एकदम म्हणाले,

" अरे हो, बरी आठवण झाली. एक गोष्ट सांगायची राहयलीच. काल मी तुम्हांला संभाजीराजांना कसं पकडलं तें सांगितलं; पण तुळशीबाईसाहेब कशा निसटल्या तें सांगायचं राहूनच गेलं. "

" तुळशीबाई निसटल्या ! " त्रिनूतात्या आश्चर्यानें उद्गारले. आम्ही सारेच आश्चर्यचकित झालों. संभाजीबरोबर तुळशीलाहि पकडलें अशीच आमची समजूत झाली होती.

" होय तर, साफ निसटल्या ! " हरिकाका उत्तरले, " महाराजांना पकडलं तेव्हां तुळशीबाई अंतःपुरांत होत्या. महाराजांना अटक झाल्याचं कळलं मात्र, त्यांनीं तावडतोब वेशांतर केलं आणि कुळंबिणीचं सोंग घेऊन मागच्या दारनं बाहेर पडल्या आणि आड वाटेनं येथें बंदरावर आल्या. त्या नाहींशा झाल्या हें त्या दुष्टांच्या ध्यानांत येण्यापूर्वीच त्यांचं जहाज दृष्टिआड सुद्धां झालं ! "

स्वभावतःच आम्ही, तें जहाज ज्या दिशेनें गेलें तिकडे पाहूं लागलों. तोंच समोरच्या मचव्यावर बसलेला एक पक्षी उडाला आणि पंख पसरून त्याच दिशेकडे दिसेनासा झाला ! "

" खरोखर शहामत त्या बाईची ! " आमच्यापैकीं एकजण म्हणाला.

" शहामत तर खरीच ! " हरिकाका म्हणाले, " पण गंगाधरपंत म्हणून आमचे एक पूर्वज होते. तुळशीबाईचे ते कारभारी होते. त्यांनीं या कामीं त्यांना बेमालूम मदत केली. "

" अस्सं ! " मी एकदम उद्गारलों. माझ्या कसल्या तरी शंकेचें समाधान होत आहेसें वाटलें. पण कसल्या तें निटसें ध्यानांत येण्यापूर्वींच

हरिकाका म्हणाले,

" म्हणून तर पुढं शाहूमहाराजांनीं आम्हाला हा वाडा इनाम दिला."

माझ्या डोक्यांत प्रकाश पडला.

" हा वाडा हें आमच्या घराण्याचं वैभव आहे—आमच्या घराण्याचा अभिमान आहे. "

हरिकाकांचा चेहरा या अभिमानानें फुलून आला होता. सूर्याच्या आरक्त प्रकाशांत त्यांचा अभिमान खुलून दिसत होता.

त्या वाडयाचे त्यांच्यावर झालेले संस्कार मला एकदम प्रतीत झाले.

"बरं तर ! या आतां. बराच उशीर झाला तुम्हांला. असें म्हणून हरिकाकांनीं आम्हाला नमस्कार केला आणि ते पाठ फिरवून चालू लागले.

मी त्यांच्याकडे निर्भर नजरेनें पाहात राहिलों—

## ५ स्त्रीचें हृदय

" प्रिय निशिकांत,

वास्तविक तुझें अभिनंदन करण्यासाठीं मी हें पत्र लिहायला हवें होतें. कु. सुहासिनी सप्तर्षी हिच्याशीं तुझा विवाह ठरल्याची बातमी मी कालच ऐकली. सकृद्दर्शनीं हा मोठा अभिनंदनीय विवाह वाटतो यांत शंकाच नाहीं. पण या प्रकरणांतलें सत्य माहित असण्याचें दुर्दैव माझ्या वांट्यास आलेलें असल्यानें मी तुझें अभिनंदन करूं शकत नाहीं. उलट तुला एक इशारा देण्यासाठीं मी हें पत्र लिहीत आहे. ही सुहासिनी तुला वाटते तशी मुळींच नाहीं. एक हुशार शिक्षिका आणि उदयोन्मुख साहित्यिका म्हणून ती येथील वाङ्मयीन जीवनांत चमकूं लागली आहे. तिची ही कीर्ति बाहेरहि पसरली असेल. पण तिच्या जीवनाला या सोज्ज्वळ बाजूखेरीज आणखी एक बाजू आहे—आणि ती मला आतां अगदीं किळसवाणी वाटत आहे. प्रो. नायडू यांचें लग्न झालेलें आहे, त्यांना दोन मुलेंहि आहेत— आणि तरिही दोन जीवांचें प्रेम अपरिहार्य झालें, तर एकाद्या कर्मठ नीतिवाजा-प्रमाणें त्याचे लचके न तोडतां सहानुभूतीनें तें समजावून घेण्याचा मी प्रयत्न करीन. पण या प्रकरणांत जी निर्दय फसवणूक आहे ती मला अगदीं असह्य झाली आहे. प्रो. नायडूंपासूनचा पिंड पोटांत पोशीत असतांना, दुसऱ्याशीं लग्न करून त्याला पितृत्वाचा औरस आधार देण्याची कल्पना मला हीन वृत्तीची वाटते. दुसऱ्याच्या आयुष्यावर असें ऐंशिट फेंकण्याचा कोणा-लाहि अधिकार नाहीं. मला हें भयंकर सत्य कसें कळलें, ही गोष्ट या पत्रांत सांगणें

सोयिस्कर नाहीं, पण तें निर्विवाद आहे एवढें नक्की समज. आपल्या एका जिवाभावाच्या मित्राला वेळींच सावध करावें या कर्तव्याच्या जाणिवेमुळेंच हें दुर्दैवी पत्र लिहिण्याचें कठोर कृत्य मी करीत आहें. त्याबद्दल तूं मला क्षमा करशीलच. कळावें.

तुझा स्नेहांकित,

सदानंद."

निशिकांतानें हें पत्र झरझर वाचून संपविलें—म्हणजे त्याच्यावरून त्यानें आपली नजर भरभर फिरविली आणि त्याच्याकडे तो नुसता निर्जीव दृष्टीनें पाहत राहिला. पहिलीं तीनचार वाक्यें वाचल्यानंतर पुढल्या मजकुराचें पूर्ण वाचन करणें त्याला अशक्यच झालें. पण त्या पत्रांत वर्णन केलेलें सत्य इतकें विदारक होतें कीं, त्याचा आघात त्याच्या मेंदूवर झालाच, आणि तो अगदीं सुन्न होऊन गेला. कांहीं काळ त्याला कांहीं सुचेना अगर जाणवेनाच. जरा वेळानें त्याच्या मेंदूला थोडाबहुत बोध होऊं लागला, तेव्हां हें पत्र बनावट असावें, कोणी तरी दुधांत विष ओतणाऱ्या दुष्ट बुद्धीनें तें आपल्याला पाठविलें असावें, अशी त्याला शंका आली. पण पत्रांतील सही आणि हस्ताक्षर यांच्याबद्दल संशय घेण्यास जागा नव्हती. मग सदानंदानेंच हें दुष्ट कृत्य केलें कीं काय ! पण ही शंका क्षणभरहि टरली नाहीं. सदानंद त्याचा जिवाभावाचा स्नेही होता. लेखकाच्या जीवनांत येणाऱ्या अडचणींमध्यें त्याला त्याचा नित्याचा आधार होता. त्याच्या स्नेहाळ प्रोत्साहनामुळें त्याच्या हातून थोडेंबहुत लेखन झालें होतें. निशिकांत पुन: शून्य झाला. त्याच्या आजूबाजूच्या वस्तू, त्याची आरामखुर्ची, त्याचें ओव्हल ग्लासचें ड्रेसिंग टेबल, भिंतीला लावलेले फोटो, कोपऱ्यांतल्या टेबला-वरची व्हीनसची मूर्ति, त्याचें पुस्तकांनीं भरलेलें कपाट—सारें कांहीं त्याला अंधुक, अस्पष्ट, अर्थशून्य दिसूं लागलें. कांहीं वेळ, कॉटच्या कोपऱ्यावर तो तसाच बसून राहिला. आपल्या मनांत काय चाललें आहे, त्याचा त्याला बोधच होईना. कांहीं तरी विलक्षण, विचित्र चाललें आहे, एवढेंच त्याला वाटे. अभावतःच त्याचे हात वर गेले आणि त्यांनीं त्याचें डोकें घट्ट दाबून धरलें.

कितीतरी वेळ तो तसाच बसून राहिला. हळुहळू त्याला आपल्या डोक्यां-तल्या विचारांची जाणीव होऊं लागली. तो उठला आणि ड्रेसिंग टेबलासमोर जाऊन आरशांत पाहात राहिला. त्याला एकदम आठवलें, कांहीं दिवसांपूर्वी सुहासिनी त्याच्या खोलींत आली होती तेव्हां तो अन् ती गालाला गाल टेकून आरशांत पहात उभीं राहिलीं होतीं—त्याला चटका बसल्यासारखें झालें आणि पुनः तो बेचैन झाला. पुनः त्याचे विचार गढूळले. जरा वेळानें पुनः त्याची जाणीव होऊं लागली. गेला महिनाभर त्यानें सुहासिनीच्या संगतींत जो स्वप्नमधुर काल घालविला होता, त्याचे विचार हालत्या पाण्यावरील पक्ष्याच्या सावल्यांप्रमाणें त्याच्या डोक्याला स्पर्श करून जाऊं लागले. गेल्या महिनाभरांतलीं अनेक दृश्यें त्याच्या नजरेसमोर रंगरूप धारण करूं लागलीं. अभ्राच्छादित आकाशांत मध्येंच चंद्र दृग्गोचर व्हावा, पुनः तो धूसर व्हावा, असें बराच वेळ या दृश्यांचें चाललें होतें. अखेरीस सुहासिनी त्याच्या जीवनांत प्रथम आली तो प्रसंग त्याच्या नजरेसमोर उभा राहिला.

—ती एक स्वप्नकथाच होती. एक दिवस दुपारीं त्याला एक पत्र मिळालें पत्रावरचें हस्ताक्षर त्याला ओळखलें नाहीं. पण तें सुबक होतें आणि स्त्रीचें असावें असें वाटलें. त्यानें घाईघाईनें पत्र फोडून वाचलें. पत्र वाचतां वाचतां त्याच्या चेहऱ्यावर आश्चर्याचे भाव उमटत गेले. अखेरीस तो जरासा गोंधळलाच पत्रच तसें होतें. त्यांत लिहिलें होतें :

" आज दुपारच्या गाडीनं मी तुम्हांला भेटायला मुद्दाम येत आहें. स्टेशनवर मला भेटाल का ? मला तेथली काहीं माहिती नाहीं. माझी ही भेटायला देण्याची तऱ्हा तुम्हाला विचित्र वाटेल. पण माणसानं नेहमीं नीट ओळखदेख, परिचय वगैरे झाल्यावरच भेटलं पाहिजे का ? अशा अनपेक्षित उत्स्फूर्त भेटींत एक प्रकारचं काव्य नसतं का ? " पत्राखालीं ' सुहासिनी समर्थ ' अशी सही होती. निशिकान्तानें पत्राचा मायना पुनः एकदां पाहिला. तो ' सप्रेम नमस्कार वि. वि. ' एवढाच होता. ही फडक्यांच्या कादंबरींतली नायिका कोण, असें क्षणभर त्याला वाटलें, पण लगेच त्याला आठवलें कीं, सुहासिनी समर्थ हें नांव मासिकांतील कवितांच्या खालीं

अलीकडे बरेंच आढळेंत. मासिकांतल्या कविता वाचण्याबद्दल तो तितकासा दक्ष नसल्यानें तिच्या कवितांचा बोध त्याला झाला नाहीं; पण लगेच त्याच्या ध्यानांत आलें कीं, या लेखिकेच्या दोन तीन लघुकथा आपण वाचलेल्या आहेत. त्या आपण वाचल्या तेव्हां या लेखिकेच्या अन् आपल्या कथांत कांहीं तरी वाङ्मयीन साधर्म्य आहे असा एक ओझरता विचार आपल्या मनांत येऊन गेला होता, असेंहि त्याला आठवलें. त्यावेळीं त्यानें त्याचा अधिक विचार केला नव्हता, पण आतां हें असें पत्र आल्यावर साहजिकच हाच विचार त्याच्या मनांत प्रबल होऊं लागला. आपल्या व तिच्या कथांची प्रेरणा एकच असावी, निसर्गाचे रंगरूप आणि गंधनाद यांनीं आपलें अंतःकरण ओलें झाल्याखेरीज कथा लिहिनाला मनाची जी एक आर्त अवस्था आवश्यक असते ती आपली जशी होऊंच शकत नाहीं, तशीच तिचीहि होत नसावी, निसर्ग आणि मानव यांच्यामधील गूढ, मनोज्ञ भावसंबंधानें आपल्याला जशी ओढ लावलेली आहे, तशीच तिलाही लावलेली असावी, असें त्याला वाटूं लागलें. तिच्या कथा आपण वाचल्या तेव्हां त्यांच्यात सकाळच्या कोवळ्या उन्हासारखें कांहीं तरी सौंदर्य असावें, असें त्याला वाटलं होतें. आतां त्याला त्याचा अर्थ समजूं लागला. आणि आपल्या या व अपरिचित सहधर्मचारिणीला भेटण्यास तो आतुर झाला.

संध्याकाळीं स्टेशनवर तो अगदीं वेळेवर हजर झाला. सुहासिनीला त्यानें कधीं पाहिलें नव्हतें. पण ती आपली बॅग घेऊन गाडींतून उतरल्या-बरोबर हीच सुहासिनी असें त्याला वाटलें आणि तो पुढें झाला. तिनेंहि त्याला पाहिल्याबरोबर एक अतिशय मधुर हास्य केलें आणि, ' निशिकान्त कितने ? ' असें विचारीत नमस्कारासाठीं हात जोडले.

त्यानें एक ओळखीचें हास्य केलें आणि माननेंच ' होय ' म्हटलें.

स्टेशनमधून बाहेर पडल्याबरोबर समोरच आपल्या चंचल नेत्रांनीं पहात सुहासिनी म्हणाली,

" एखाद्या हॉटेलमध्यें जाऊं या आपण. "

" कां ? घरीं चला ना. " निशिकान्त म्हणाला.

" नको. कोणाच्या घरींबिरीं नको. जीव गुदमरतो माझा तिथं. हॉटेलांत

मोकळेपणानं बोलायला मिळतं. शिवाय, मी आतां रात्रींच्या गाडीनंच परत जाणार आहे. चला. ”

असें म्हणून ती समोरच्या हॉटेलच्या दिशेनें चालायलाहि लागली. तिचें तें उत्तर, तें देण्याची तिची तरल पद्धत आणि वागण्यांतला मोकळे-पणा–निशिकान्ताला तें सारें अगदीं गोड वाटलें. तीं दोघें हॉटेलांत शिरलीं आणि फॅमिलीरूममध्ये जाऊन बसलीं. बसल्याबरोबर सुहासिनी म्हणाली,

“ चहा मागवा बुवा चार दोन कप ! ” तिचा तो खळकर सलगीचा स्वर त्याला अगदीं अनपेक्षित वाटला आणि म्हणूनच त्याला तो आवडला. पण परकी स्त्रियांशीं सलगीनें वागण्याची त्याला संवय नव्हती. थोडेंसें गोंधळलेल्या स्वरांत त्यानें विचारलें,

“ तुम्हाला जेवायचं नाहीं का ? खानाच मागवूं आपण ? ”

“ अह नको. चहाच मागवा. चहा म्हणजे माझं जीवन आहे. आपल्याला तीनचार तास बसायचं आहे. तेवढ्यांत तीनचारदां चहा अन् बरोबर खाणं होईलच, तेवढ्यानं जेवण आपोआपच उरकेल. ”

निशिकान्तानें वेटरला बोलावून चहा मागविला आणि तिच्याकडे तो नुसता पाहात राहिला.

त्याची गोंधळलेली मुद्रा पाहून तीहि गप्प झाली. टेबलावर त्याचें एक पुस्तक पडलें होतें तें तिनें उचललें आणि तें ती चाळूं लागली. पण तिच्या चेहऱ्यावर संभाषणाची इच्छा स्पष्ट दिसत होती

तरी निशिकान्त बोलला नाहीं. तो एकदां तिच्याकडे आणि एकदां खिडकीबाहेर असा पाहात राहिला. तिच्या चंचल नेत्रांचें त्याला आश्चर्य वाटत होतें. पुस्तक चाळतांना ती क्षणमात्र एकाग्र होई आणि तिच्या डोळ्यांच्या पापण्या थोड्याशा मिटून त्यांच्यावर गांभीर्याची झांक मारे. तिच्या नेत्रांचे हे बदल त्याला मनोहर वाटत होते. पण त्यांच्याकडे निश्चल नजरेनें तो पाहू शकत नव्हता. तिच्या चेहऱ्याचें आकर्षकत्वहि त्याचें चित्त वेधित होतें. त्याला ती विशेष सुंदर वाटत नव्हती, पण तिचें विशाल भाल आणि रेखीव नाक यांनीं तिच्या चेहऱ्याला एक प्रकारचें सुसंस्कृत चैतन्य प्राप्त करून दिलें होतें. तिच्या ओठांची मुरड थोडीशी

मादक वाटे. विशेष म्हणजे तिचा बांधा त्याला फार मोहक वाटला होता. ती उंच बारीकच होती. चापूनचोपून नेसलेल्या तलम पातळामुळें ती त्याला अधिकच बारीक वाटली. पण तिच्या अवयवांना असा कांहीं सुबक आकार होता कीं, ती किडकिडीत वाटत नसे. तिचे तरतरीत हावभाव आणि भिरभिर नजर यांमुळें तिच्या देहांत एक सतेज सळसळ प्रत्ययास येई. पण निशिकान्ताला तिच्या चंचल नेत्रांनींच विशेष मोहिनी घातली होती. तिच्या नितळ श्यामल चेहऱ्यावर नाचणारे तिचे पाणीदार डोळे पाहून त्याला चांदण्या रात्रीं समुद्राच्या पाण्यावर उड्या मारणाऱ्या मासळ्यांची आठवण झाली. त्या तिच्या नेत्रांकडे पाहात राहण्याचा मोह त्याला होत होता. पुस्तक चाळतां चाळतां मध्येंच अचानक तिनें नजर वर केली म्हणजे त्याच्या डोळ्याला तिचा डोळा भिडे आणि तो चटकन् नजर फिरवी. तिच्या हें ध्यानांत आल्याबरोबर ती हंसली-अगदीं गोड हंसली. त्याबरोबर तिचे दुधासारखे स्वच्छ दात झळकले आणि त्याला एकदम मोत्यांचा सर फिरल्यासारखें वाटलें. त्याला त्या हास्याची फार मजा वाटली, पण तिच्या नजरेला नजर भिडविण्याचें धाडस त्याला होईना. वेटरनें आणून ठेवलेला चहाचा कप तोंडाला लावून तो खिडकी-बाहेर पाहात राहिला. तेथून स्टेशन दिसत होतें. पाहतां पाहतां त्याची नजर सिग्नलच्या लाल दिव्यावर खिळली. जरा वेळानें तो तिच्या बोलण्यानें भानावर आला, तेव्हां ती म्हणत होती.

" आपण गप्प बसूं नये गडे असं !"

निशिकान्त एकदम गडबडला. कांहीं तरी बोलायचें म्हणून तो म्हणाला,

" काय ?"

" मी म्हणत होतें, आपण कांहीं तरी बोलूं या. "

" बोलूं या ना. "

" मला तुमच्या कथांबद्दल कांहीं विचारायचं आहे. "

" हो, हो, विचारा ना. " निशिकान्त खुलला. लघुकथांची चर्चा करण्याची त्याला फार हौस होती.

" तुमच्या 'बागेश्री' कथेंतली कल्पना तुम्हाला कशी सुचली ?—शेवंतीच्या स्वभावाची छटाच तुम्हाला प्रथम प्रतीत झाली ना ?"

" होय—पण तुम्हाला कसं हें समजलं ?"

" मला एखादा लेखक आवडला की, त्याचं वाङ्मय मी पुनः पुनः वाचतें. त्याच्यावर पुनः पुनः विचार करतें. त्याच्याशीं समरस होतें. अखेरीस तें जणु आपलंच वाङ्मय आहे असं वाटायला लागतं आणि त्याचं अंतरंग उघड होऊं लागतं. असं झालं म्हणजे त्या लेखकाशींहि एकरूप झाल्यासारखं वाटतं "—असें म्हणून सुहासिनीनें त्याच्याकडे जरा भेदक नजरेनें पाहिलें. निशिकांत गोंधळला आणि बाहेर पाहूं लागला. ती बोलतच होती—" पण असं होण्यासाठीं पुस्तकाचं फार कसून वाचन करावं लागतं. हें तुमचं पुस्तकच पहा, म्हणजे तुम्हाला त्याच्यावर माझ्या वाचनाच्या किती खुणा आहेत तें दिसेल."

असें म्हणून तिनें बॅग उघडली आणि त्याच्या कथासंग्रहाची एक प्रत बाहेर काढली. त्यानें ती चाळली आणि तो चकित झाला. सारें पुस्तक नुसतें चितारलें होतें. ठिकठिकाणीं मार्मिक आणि मजेदार अभिप्राय लिहून ठेवले होते. उपमा, दृष्टांत अधोरेखित केले होते आणि बाजूला त्यांच्यांतून व्यक्त होणाऱ्या वृत्तीबद्दल अदाज व्यक्त केले होते.

" तुम्ही ही प्रत मला द्याल का ?—मला ती एक अमोल देणगी वाटेल।" त्यानें थोडयाशा अवघडलेल्या स्वरांत विचारलें.

ती एक दोन क्षण थांबून म्हणाली,

" खरं म्हणजे माझीं पुस्तकं मी कोणाला देऊन टाकित नसतें—पण तुम्हांला नाहीं म्हणणं माझ्या जीवावर आलं आहे. ठेवा तें पुस्तक तुम्ही. माझी आठवण तरी होईल तुम्हांला त्याच्यामुळें सदोदित."

" त्यासाठीं कांहीं या पुस्तकाचीच गरज नाहीं." थोडेंसें हंसत तो म्हणाला.

···आतां या पहिल्या भेटीचा विचार करतांना त्याला आपले ते उद्गार आठवले. त्याला वाटलं, 'खरंच, किती विचित्र रीतीनं खरे ठरत आहेत हे उद्गार ! या ( ईची आठवण राहण्यासाठीं या पुस्तकाची आतां कांहींच

गरज नाहीं. जिचा वण कधीं नाहींसा होणार नाहीं अशी भयंकर जखम आपल्या अंत:करणावर करून ठेवली आहे तिनं !'

तें पुस्तक ज्या कपाटांत त्यानें ठेवलें होतें त्याच्याकडे त्याचें लक्ष गेलें. तें पुस्तक घ्यावें आणि त्याचे तुकडे तुकडे करावे असें त्याला वाटलें. पण त्यानें कांहींच केलें नाहीं. तो नुसता विचार करीत राहिला. पुढलें संभाषण त्याला आठवलें...

त्याच्या या उद्गारांवर तिनें नुसतें एक हास्य केलें. कांहीं क्षण थांबून ती म्हणाली,

" मीं माझी कवितांची वही आणली आहे—तुम्हाला वाचून दाखवूं का ? "

" हो, हो ! " असें निशिकान्त म्हणाला आणि त्यानें वेटरला बोलावून आणखी चहा मागविला.

तिनें कविता वाचण्यास सुरवात केली. तें काव्यगायन नव्हतें आणि काव्यगायन तिला जमत असेल असें त्याला वाटलें नाहीं. त्या काव्यांत कांहीं अगदीं नवीन किंवा अपूर्व असेहि त्याला वाटलें नाहीं. पण त्यांतील प्रणयाची दिलखुलास मादकता आणि शब्दयोजनेची तरलता यांनीं त्याचें मन वेधून घेतलें. एका कवितेंतली कल्पना त्याच्या मनावर जरा विशेष ठसली. पारिजातकाच्या वासाच्या ओढीनें बागेंत शिरलेल्या एका तरुणीला रातराणीच फुललेली कशी आढळते आणि या फसवणुकीनें तिच्या मनांत कोणत्या भावना निर्माण होतात याचें वर्णन त्या कवितेंत होतें. ती कविता वाचून झाल्याबरोबर निशिकान्तानें तिच्या हातांतली वही घेतली आणि तो ती वाचूं लागला. इतक्यांत तिनें आपला हात त्याच्या हातावर ठेवला. तिच्या हाताचा स्पर्श झाल्याबरोबर त्यानें झटकन् आपला हात काढून घेतला. त्याबरोबर तिनें विचारलें,

" कां हो ? "

" कांहीं नाहीं—तुमचे हात जरा गार लागले. "

त्याच्या गोंधळलेल्या स्वरावरून त्याचें हें उत्तर लटकेंच होतें, हें तिनें ओळखलें. ती हंसली नि म्हणाली,

" पण मग मला तुमचे हात गरम लागायला हवेत. पाहूं दे. "

तिनें त्याचे हात हातांत घेतले—व क्षणभरानें म्हटलें,

" तुमचे हात किती मऊ मऊ आहेत ! "

तो हंसला. यावेळीं त्यानें आपला हात काढून घेतला नाहीं. उलट तिच्या हातावरील रेषा तो पाहूं लागला. तिचा हात आपल्या हातांत ठेवण्यासाठीं केलेलें तें एक नाटक होतें, याची त्याला आतांच्या त्याच्या विचित्र मन:स्थितींतहि जाणीव झाली आणि अंत:करणांत एक उद्वेगाचा कढ निघाला. पुढील आठवणीनें हा उद्वेग अधिकच दाटला.

साडे अकरा वाजतां हॉटेल बंद होण्याची सूचना त्याला वेटरनें दिली. त्यानें बिल मागविलें आणि पैसे चुकते केले—व तीं दोघें जावयास उठलीं. टेबलाच्या दोन बाजूंकडून दरवाज्याशीं तीं एकदम आलीं. तिच्या खांद्याला त्याचा थोडा स्पर्श झाला. त्याबरोबर ती त्याच्याकडे सरकली आणि त्याला थोडीशी बिलगलीच. तिच्या देहाच्या सळसळीचा त्याला एकदम प्रत्यक्ष प्रत्यय आल्यासारखा वाटला. तो अगदीं उन्मनस्क झाला—त्यानें तिच्या कमरेभोंवतीं हात घालून तिला जवळ ओढलें आणि आवेगानें तिचें चुंबन घेतलें. तिच्या श्वासाचा गंध विलक्षण उन्मादक होता. त्यानें दोनहि हातांनीं तिचा चेहरा धरला आणि तिच्या ओठांवर चुंबनांचा वर्षाव चालविला. तिनें आपले डोळे मिटून घेतले होते आणि त्याचें भान उडालें होतें. क्षणभरानें तिनें ते उघडले आणि त्याच्याकडे पाहून ती हंसली—आणि मानेला एक झटका देऊन म्हणाली,

" चला—नाहींतर गाडी चुकेल माझी. "

पण गाडीला अद्याप अर्धा पाऊण तास अवकाश होता. तेव्हढा वेळ त्यांनीं भटकत काढण्याचें ठरविलें. भटकतां भटकतां तीं स्टेशनपासून थोड्याच अंतरावर एक नदी वाहत होती तेथें आलीं आणि कांठच्या एका झाडाखालीं बुंध्याच्या पाळावर बसलीं. हवेंत थोडा गारठा होताच, तो नदीकांठीं थोडासा अधिकच भासला. एकमेकांना बिलगून बसणें त्याहि दृष्टीनें सुखावहच होतें. वर आकाशांत चंद्र प्रकाशत होता आणि त्या झाडाखालीं त्यांच्या अंगावर निरनिराळ्या चित्राकृतींचा छायाप्रकाश पडला

होता. थोडासा वारा आला कीं त्यांच्या अंगावरची ही कवडशांची चादर जरा हाले, चाळवे आणि त्यांना थंडीची शिरशिरी वाटे. त्यांचें आजुबाजूकडे मुळींच लक्ष नव्हतें. बऱ्याच वेळानें स्टेशनमधून एक इंजिन शिटी फुंकत गेलें आणि तीं भानावर येऊन उठलीं.

तीं स्टेशनांत पोंचलीं तेव्हां गाडीला पांचसात मिनिटेंच होतीं. अंधारांतल्या एका बाकावर तीं वाट पाहात बसलीं. दोघेंहि कांहीं बोलत नव्हतीं. निशिकान्ताच्या मनांत या आकस्मिक भेटीबद्दल विचार चालले होते आणि सुहासिनी आतां जाणार म्हणून विरहाची एक छटा या विचारांना थोडी धार प्राप्त करून देत होती. गाडी येण्याची सूचना झाल्याबरोबर सुहासिनी त्याचा हात दाबून म्हणाली,

" निशिकान्त, आजचं हें सारं विसरून जायचं हं. "

तिच्या या उद्गारापेक्षां तिनें हात दाबल्यावर त्याच्या अंगांत जी एक गोड शिरशिरी उठली तीच त्याला अधिक जाणवली.

गाडी आली. सुहासिनी डब्यांत शिरली. गाडीनें एक कर्कश शिटी फुंकली. त्यांनी एकमेकांचा निरोप घेतला. गाडी सुरू झाली. निशिकान्त तिच्याकडे पाहूं लागला. तिच्या मागचा लाल दिवा दृष्टीआड होईपर्यंत तो तिच्याकडे पाहात होता.

' विसरून जा ' असें सुहासिनी त्याला म्हणाली होती खरी, पण तें त्याला शक्य नव्हतें. त्या रात्रीं तो झोपला नाहीं. दुसऱ्याच दिवशीं तिला पत्र लिहिण्याचा अनिवार मोह त्याला झाला. त्या दिवशीं त्यानें स्वतःला आवरलें. पण तिसऱ्या दिवशीं तें लिहिलें. तें वाट चालत असतांनाच सुहासिनीचें पत्र त्याच्या हातांत पडलें. त्या योगायोगाची त्याला फार गंमत वाटली. वाङ्मयीन प्रकृतीप्रमाणें याहि बाबतींत आपल्यामध्यें किती साधर्म्य आहे हें मनांत येऊन तो स्वतःशींच म्हणाला, आम्ही दोघें एकमेकां-साठींच जन्माला आलों आहोंत काय !

एकीकडे हा प्रश्न स्वतःला विचारीत असतांनाच त्यानें तें पत्र फोडलें. 'परवांसारखीच मी पुनः उद्यां येत आहें. स्टेशनवर या ' एवढाच मजकूर पत्रांत होता. त्यानंतर सुहासिनी आठवड्यांतून तीनचारदां येऊं लागली—

आणि निशिकान्ताच्या बिन्हाडी रात्रीं साडेबारा एकपर्यंत दिवा लागेनासा झाला !

महिनाभराच्या आंत त्यांनी विवाहबद्ध व्हावयाचे ठरविलें !

त्या कालांत तो हवेंत वावरत होता. रोमांचाच्या उद्यानांत त्याचें अखंड वास्तव्य होतें. प्रीतिनिर्भर आयुष्याचीं अस्मानी स्वप्नें त्याला पडत होतीं. पृथ्वीचा स्पर्श झालाच तर तो मखमली वाटे. झाडावरचीं फुलें त्याला स्वप्नांसारखीं भासत. आकाशांत फुलें फुललेलीं दिसत. माणसांत परमेश्वराचा साक्षात्कार होई. कवींनीं केलेलीं यक्षलोकांचीं वर्णनें हीं प्रेमाच्या उन्मादांत केलेलीं पृथ्वीचीच वर्णनें आहेत असा एक त्याचा आवडता सिद्धांत होता. या कालांत तो स्वतःच या सिद्धांताचा पुरावा बनला होता !

त्याच्या या यक्षलोकावर सदानंदाच्या पत्रानें आज वीज कोसळली त्याच्या साऱ्या स्वप्नांचे एकदम कोळसे झाले ! त्याच्या डोळ्यांपुढें अंधारी आली. तो पुनः शून्य, सुन्न बनला. जरा वेळानें त्याच्या डोक्यांत एक संतापाची सणक उठली. गेला महिना दीड महिना आपली केवढी भयंकर फसवणूक चालली होती याची जळती जाणीव त्याला होऊं लागली. सुहासिनीनें-या सटवीनें-आपल्या भोंवतीं मायाजाल पसरून आपली केवढी क्रूर वंचना केली ! तिनें लिहिलेलीं प्रणयमधुर पत्रें, तिनें केलेली स्वतःच्या व आपल्या वाङ्मयाची गोड चर्चा, तिनें फुलविलेली रोमांचाची सृष्टि, तिचीं तीं चुंबनें, आपल्या केसांत आरशी नाजूक बोटें घालून तिनें फुलविलेल्या भावना, दृष्टींत दृष्टि मिसळून पाहिलेलीं अंतरंगांतलीं हृदयें, तिच्या नेत्रांचें तें उन्मादक नृत्य---सारें सारें नाटक होतें, नुसती प्रतारणा होती, या विचारानें त्याच्य अंतःकरणाचा दाह होऊं लागला ! आपल्या अंतःकरणांत कोळिष्टके जमा होत आहेत आणि त्यांना आग लागत आहे, असें कांही तरी विचित्र विचित्र त्याला वाटूं लागलें. संतापानें शिर फुटेल असें झालें !

—एकदम त्याला सबंध स्त्रीजातीविषयीं तिरस्कार वाटूं लागला.

त्याचें अंतःकरण स्त्रीविषयींच्या द्वेषानें भरून गेलें. स्त्रीजातीबद्दल कवींनीं आणि थोर तत्त्वज्ञांनीं लिहिलेलीं वचनें त्याला आठवूं लागलीं. स्त्रीची देवता म्हणून पूजा करणाऱ्या, तिच्याभोंवतीं शब्दांची स्वर्गसृष्टि निर्माण करणाऱ्या कवींचा त्याला संताप आला! स्त्रीच्या उदात्त अंतःकरणाचीं सूक्तें सांगणाऱ्या तत्त्वज्ञांची त्याला चीड आली! स्त्रीविषयींचें महान् सत्य यांना एकंदरीनें कधीं सांपडलेंच नाहीं! मूढ बेटे! तिच्या मायाजालांत सांपडलेलीं सावजें! त्याला या कवींचीं कींव आली.

—संतापानें त्याच्या जिवाची तगमग होऊं लागली. त्याला खोलींतल्या खोलींत राहणें अशक्य झालें. कोठें तरी जावें म्हणून त्यानें कपडे चढविले——बाहेर पडतां पडतां कोपऱ्यांतल्या टेबलावरची व्हीनसची मूर्ति त्याच्या नजरेस पडली. त्यानें ती मूर्ति उचलली आणि खिडकींतून बाहेर भिरकावली!

तो रस्त्यावर आला. पण त्याला कोठें जावें हें समजेना. अखेरीस ज्या रस्त्याला फारसें कोणी भेटणार नाहीं, विशेषतः कोणी ओळखीचें भेटणार नाहीं, अशा रस्त्यानें तो निघाला. त्याला माणूस डोळ्यासमोर नकोसें झालें होतें. कोणीहि दिसला कीं, त्याला त्याच्यांत पशुत्वाचा भास होई आणि त्याच्या चेहऱ्याचें तो कोणत्या तरी प्राण्याशीं साम्य हुडकूं लागे—आणि एकदम त्याला त्या चेहऱ्याचा उबग येई. मनुष्य हें पशूचेंच उत्क्रांत स्वरूप आहे हा शोध त्याला माहित होता. पण आतां मनुष्य हा त्याला पशूपेक्षांहि हीन वाटूं लागला. पशूंच्या जगांत निदान इतकी निर्दय वंचना तरी नसते! त्याला सभोंवार माणसांच्या वंचनेचाच विलास दिसूं लागला. एका दुकानांत दुकानदार गिऱ्हाइकाला कांहीं माल दाखवित होता—तो त्याचा गळा कापीत आहे असें त्याला वाटलें! जरा वेळानें समोरून एक जोडपें आलें. बाई पुरुषाला कांहीं तरी हंसत हंसत सांगत होती आणि तो स्मित मुद्रेनें तें ऐकत होता. तिच्या हास्यांतलें कपट त्याला कळत नव्हतें म्हणून निशिकान्ताला त्याची कींव आली! वळणावरच्या झाडाला सिनेमाची एक जाहिरात नटनटींची त्याला दिसली. कोणी तरी उपद्व्यापी कार्ट्यानें त्या जाहिराती-

तल्या नायिकेला दाढीमिशा काढल्या होत्या. त्याला एकदम हंसूं आलें. त्या नायिकेचा दंभस्फोट करणाऱ्या कार्ट्यांचें त्याला कौतुक वाटलें ! यानें त्याच्या मनावरचा ताण थोडा कमी झाला. त्याला थोडें हलकें वाटूं लागलें तोंच त्याला एक तरुणी दिसली. एकाद्या सिनेमा नटीसारखा तिचा पेहराव होता आणि ओंठ तांबड्या गडद रंगानें रंगविलेले होते—विषानें माखलेल्या या ओठांनीं किती तरुणांच्या ओठांत विष ओतलं असेल, असा विचार त्याच्या मनांत आला आणि पुनः त्याला उद्विग्नतेनें घेरलें.

फिरत फिरत तो गांवाबाहेर आला. त्याच्या गांवच्या पूर्वेस एक टेकडी होती. तिकडे त्याचे पाय वळले. तो टेकडीवर आला तेव्हां दिवस मावळूं लागला होता. टेकडीवर पूर्वी जंगल होतें आणि आतांहि तेथें अजस्र पुराणवृक्ष आपला घनदाट विस्तार पसरून उभे होते. त्यामुळें तेथें रात्रीच्या अंधारानें पंख पसरल्यासारखें वाटत होतें. निशिकान्ताला कसली ओढ वाटत होती नकळे, तो त्या वृक्षांमधून वाट काढीत टेकडीच्या टोकाकडे आला. तेथें टेकडीला एक कडा तुटला होता. त्या कड्यावर उभा राहून त्यानें खालीं दृष्टि टाकली. खालीं खडकाळ कातळ होता आणि तेथेंच त्याच्या गांवची नदी त्या टेकडीला वळण घालून वाहत होती. वळणामुळें नदीचें पात्र विलक्षण विस्तृत झालें होतें. पात्रांत मोठमोठे भयाण काळे फत्तर पडले होते आणि नदीचें पाणी पलीकडच्या कांठानें डोह करून वाहत होतें. ती टेकडी आणि तिच्यावरचे अजस्र वृक्ष यांची संध्याकाळची छाया त्या नदीवर पडली होती आणि नदीचा डोह भयाण वाटत होता. त्या डोहाच्या पलीकडे कांठींच कसलेंसें एक झाड होतें. त्याच्यावर एकहि पान नव्हतें. त्याचा तो निष्पर्ण अवतार विचित्र वाटत होता. पावसाळ्यांत वाहून आलेला बराचसा फुकट–करपट केरकचरा त्या झाडाच्या बुंध्याला अडकला होता आणि एकादा वेडा कमरेला चिंध्या गुंडाळतो तसें तें झाड दिसत होतें. त्या झाडाच्या खालच्या बाजूस, नदीच्या कांठीं स्मशान होतें आणि त्यांत मोडकेतोडके बांबू आणि फुटकीं तुटकीं मडकीं इकडे तिकडे टाकलेलीं होतीं. नदीचें तें दर्शन निशिकान्ताला इतकें विद्रूप वाटलें ! ही नदी म्हणजे आपल्या गांवचें एक जीवंत काव्य

आहे असें त्याला वाटत असे, सायंकाळच्या सोनेरी प्रकाशात जी नदी त्याला सौंदर्याचीं नवनवीं रूपें दाखवीत असे, ज्या नदीच्या कांठानें सुहासिनी-बरोबर चांदण्या रात्रीं तो अनेकदां हिंडला होता, ज्या नदीवर आलेल्या वृक्षाच्या आडव्या फांदीवर बसून तिच्यासह त्यानें खूप प्रणयविलास केला होता, त्या नदीला इतकी भेसूर बाजू असेल असें त्याला आजवर वाटलें नव्हतें. त्याच्या मनात विचार आला, खरोखर, स्त्रीचें हृदय या नदीच्या पात्राप्रमाणेंच नाहीं का ?

त्याला नदीचें तें दर्शन असह्य झालें. तो तेथून निघाला आणि टेक-डीच्या उत्तरेच्या दिशेनें गांवांत यायची एक वाट होती तिने चालूं लागला. तो टेकडी उतरूं लागला, पण आपण कोणीकडे व कां जात आहोंत याचें नीटसें भान त्याला नव्हतें. जरा वेळानें कसल्या तरी विपरीत आवाजानें तो भानावर आला. तो थबकला आणि त्यानें आजुबाजूला पाहिलें. एका झोंपडीच्या शेजारी एक कुत्रा मोठमोठ्यानें भुंकत होता आणि झाडावरून एक माकडी पोराला पोटाशीं धरून कचकचत होती. दोन तीन शेतकरी मुलें झोंपडीच्या दाराशीं उभी राहून ही गंमत पाहत होतीं. निशिकान्ताचें तिकडे लक्ष वेधलें. तो तिकडे गेला, तेव्हां तो कुत्रा त्या माकडीवर भुंकत असल्याचें आणि माकडी त्याला च प्रत्युत्तर देत अस-ल्याचें त्याच्या ध्यानांत आलें. लगेच तो आपली मनोव्यथा विसरला आणि हें भांडण कां लागलें आहे याची त्या मुलांपाशीं चवकशी करूं लागला. दुपारीं कुत्र्यानें त्या माकडीच्या पिलावर झडप घालून त्याला जखमी केलें आणि तेव्हांपासून ती माकडी त्या कुत्र्यावर कचकचत आहे असें त्याला समजलें. त्यानें माकडीकडे पाहिलें. तिचा चेहरा खवळून गेला होता आणि तिच्या कचकचाटांत विलक्षण क्रोध आणि आवेग जाणवत होता आपल्या पिलाच्या संरक्षणासाठीं आकाशपाताळ एक करून सोडण्याची तिची तयारी दिसली. मातृप्रेमाच्या त्या प्रखर आविष्काराचें त्याला आश्चर्य वाटलें. मातृत्वाच्या प्रचंड शक्तीची त्याला प्रतीतीच आली. त्याच्या मनांत विजेसारखा एक विचार चमकला, सुहासिनीनें आपल्याशीं जी इतकी अघोर प्रतारणा केली, ती मातृत्वाच्या ओढीमुळेंच असेल काय

आपल्या पोटांतल्या जिवाच्या कल्याणासाठीं तर तिला हा खोटेपणा करणें भाग पडेल नसेल !

हा विचार त्याच्या मनांत आला आणि त्याला एकदम हायसें वाटलें. त्याच्या मनावरचा ताण कमी झाला. जीवनावरचा त्याचा विश्वास गेल्या दोन–तीन तासांत वठून गेला होता, त्याला पुनः पालवी फुटते आहेसें वाटलें.

पण इतक्यांत त्याला सकाळींच वर्तमानपत्रांत वाचलेली एक बातमी आठवली. एका बाईनें आपलीं लहान लहान मुलें वाऱ्यावर टाकून आत्महत्या केली होती. आत्महत्या कांहीं कोणी विनाकारण करीत नाहीं. तिला जीवन असह्य झालें असेल. पण आतां हीं कच्चींबच्चीं काय करणार ! तीं कोणाच्या तोंडाकडे पाहणार ! त्यांच्यासाठीं तरी तिनें तें असह्य जीवनहि जगण्याचा प्रयत्न करायला नको होता काय ! त्यांना असें निर्दय जगावर फेंकून देऊन मरण्याचा हक्क तिला नव्हता. त्यांच्या पोटाला चतकोर भाकर घालण्यासाठीं तरी तिनें जगायला हवें होतें. त्याला पुरांत बुडणाऱ्या आणि स्वतःचा जीव वाचविण्यासाठीं आपलें पोटचें पोर पुराच्या पाण्यांत फेंकून देणाऱ्या माकडीची कथा आठवली. मी आतांच एका माकडीचें मातृप्रेम पाहिलें खरें, पण तिच्या स्वतःच्याच जीवावर बेतलें तर तिचें मातृप्रेम टिकलें असतें का, हा प्रश्न आहे— तो स्वतःशींच म्हणाला, तें कांहीं नाहीं. स्त्री ही अखेरीस अत्यंत स्वार्थी जात आहे. तिला स्वतःपलीकडे जग नाहीं. आपल्या जीवनाचें केंद्र आणि परीघ ती स्वतःच असते. मातृत्वाचें केवढेंहि ढोंगसोंग तिनें केलें—

हा विचार त्याच्या मनाला स्पर्श करतो आहे तोंच त्याच्या स्मृतीला कसला तरी धक्का बसला आणि त्याच्या स्वतःच्या आईची मूर्ति त्याच्या नजरेसमोर उभी राहिली. आईची ती करुण सात्त्विक मुद्रा आणि मायेनें ओथंबलेले ते डोळे ! क्षणभर तो सारें विसरला आणि या स्मृतींत मुग्ध झाला. भानावर आला तेव्हां त्याच्या डोळ्यांसमोर बालपणाचा तो विलक्षण प्रसंग तरळत होता...

त्याच्या आईचें त्यावेळीं डोकें फिरल्यासारखें झालें होतें. परिस्थितीमुळें तिच्या मेंदूवर आघात झाला होता. त्याच्या वडिलांची नोकरी सुटली होती आणि वर्षभर वणवण भटकूनसुद्धां त्यांना कोठे नोकरी मिळत नव्हती. त्यांतच त्याची आई प्रसूत झाली. गरोदरपणांत तिची आबाळ झालीच होती. याचा व्हायचा तोच परिणाम झाला. ती आजारी पडली तितक्यांत त्याचे आजोबा वारले. वृद्ध होऊनच वारले, पण त्याच्या नतद्रष्ट आजीनें 'हा नव्या मुलीचा पायगुण' अशी आदळआपट करण्यास सुरवात केली. त्याच्या आईने हे कित्येक दिवस तोंडाला खीळ घालून सहन केलं. पण काळजीनें आणि आजारीपणानें शिणलेल्या तिच्या मेंदूस अखेरीस तें असह्य झालें—आणि एक दिवस ती भ्रमिष्ट झाली.

निशिकान्त तेव्हां लहान होता. आईच्या आजाराचं विपरीत स्वरूप ओळखण्याचं त्याचं वय नव्हतं. इतर मुलाच्या मानानें तो जरा हूडहि होता. तो नेहमीं कांहीं तरी द्वाडपणा करी. त्याच्या आईचा भ्रमिष्ट मेंदू यामुळं अधिकच चाळवे आणि ती त्याला फाडफाड बोलूं लागे. एक दिवस त्यानं फारच त्रास्यपणा केला. आपल्या तान्ह्या बहिणीस त्यानं पायरीवरून पाडलं. भ्रमिष्ट आई भडकली. तिच्या हाताशीं हातोडी सांपडली. 'ये तुझं डोकंच फोडून टाकतें-म्हणजे तुझी पीडा कायमची मिटेल!' असें म्हणत हातोडी उगारून ती त्याच्या अंगावर धांवून गेली. आपल्या आईचे ते भयंकर रूप, तिचे विखार कालवलेले डोळे पाहून तें पोर घाबरून गेलें. तो भेदरून जागच्या जागींच थबकला. त्याच्या आईनें डाव्या हातानें त्याचा हात पकडला आणि उजव्या हातानें हातोडी उगारली. ती आतां त्याच्या डोक्यांत बसणार—

इतक्यांत तिनें ती हातोडी दूर फेकून दिली आणि त्याला पोटाशीं धरून 'माझा बाळ' 'माझा सोन्यासारखा बाळ तो' असें म्हणत ती रडूं लागली. ती किती तरी वेळ ओक्साबोक्शीं रडत होती आणि आपल्या पोटच्या गोळयाचा नाश करायला गेल्याबद्दल स्वतःला शापून घेत होती.

निशिकान्ताच्या डोळ्यांसमोर हा सारा प्रसंग उभा राहिला—त्याच्या साऱ्या रेषा-रेखांसह उभा राहिला—आईची ती करुण, विकल, भ्रमिष्ट

मूर्ति समोर दिसूं लागली आणि त्याला मातेच्या हृदयाचा साक्षात्कार झाला. वेडाच्या लहरींतसुद्धां आपल्या आईचें मातृप्रेम नष्ट झालें नाहीं, नव्हे त्यानें वेडावर विजय मिळविला!

या आठवणीनें निशिकान्ताची मनःस्थिति मोठी चमत्कारिक झाली. आईच्या दुर्दैवी स्थितिबद्दलचें दुःख आणि तिच्या अभिजात मातृप्रेमाविषयींची कृतज्ञता या भावनांनीं त्याचें मन भरून गेलें.

बराच वेळ त्याला कांहीं सुचत नव्हतें. निर्बोध मनानेंच तो पावलें टाकीत होता. हळुहळू त्याचें मन शांत होऊं लागलें. त्यांतला क्षोभ, आवेग आणि नंतरची निर्बोधता नाहींशी होऊं लागली. त्याचें चित्त प्रसन्न होऊं लागलें. बराच वेळ न अनुभवलेली शांतता आपल्या प्रत्ययास येत आहे असें त्याला वाटूं लागलें. सभोंवतालच्या वस्तूंचा तो विचार करूं लागला. आतां चांगला काळोख पडला होता. सायंकाळचा वाराहि पडला होता. झाडें निश्चल उभीं होतीं. अगदीं मुग्ध, अंतर्मुख झालीं होतीं. आकाशाच्या पार्श्वभूमीवरचा त्यांचा विस्तार स्निग्ध-कोमल वाटत होता. आकाशांतील नक्षत्रांच्या मंद प्रकाशांत त्यांच्यावर कसलें तरी रेशमी सौंदर्य विखुरलें आहे असें वाटे. त्यानें वर आकाशांत पाहिलें. समोर अरुंधतीचा तारा चमकत होता.

त्याला सुहासिनीची आठवण आली. पण या आठवणींत आतां क्षोभ नव्हता. तो शांत चित्तानें तिचा आतां विचार करूं लागला. तो करीत असतांनाच त्याच्या आईची स्मृतिहि त्यांत मिसळूं लागली. आई आणि सुहासिनी, दोघींचेहि चेहरे त्याच्या नजरेसमोर येऊं लागले आणि त्याला वाटलें—

होय, मातृप्रेमाच्या ओढीनेंच आपली फसवणूक करण्यास सुहासिनी प्रवृत्त झाली.

त्याचें मन एकदम तरल बनलें. सुहासिनीच्या संगतींत घडलेल्या प्रसंगांचीं दृश्यें त्याच्या दृष्टीसमोर तरळूं लागलीं. तिच्या सहवासस्मृतींनीं त्याच्या मनांत गर्दी केली. या स्मृती क्षणांत स्पष्ट होत, क्षणांत अंधुक होत. अखेरीस तिनें वाचून दाखविलेल्या एका कवितेच्या ओळी त्याला आठवूं

लागल्या. ही कविता एका कोकिळेसंबंधीं होती. कावळ्याच्या घरट्यांत अंडीं घातल्यानंतर ती कोकिळा तें विसरून जात नाहीं, तर दुसऱ्या दिवशीं त्या घरट्यावर जाऊन घिरट्या घालते आणि आर्त स्वरानें ओरडते, अशी त्या कवितेची कल्पना होती. त्यावेळीं ती त्याला थोडी अस्वाभाविक वाटली होती, पण आतां तिच्यांत त्याला अर्थ वाटूं लागला आणि ती कविता वाचून दाखवितांनाची सुहासिनीची आर्त, गंभीर मुद्रा त्याला आठवली. त्याला वाटलें,

होय, असेंच असलें पाहिजे. प्रो. नायडूंशीं लग्न करणें शक्य असतें तर तिनें आपली अशी फसवणूक कशाला केली असती ! खरोखर, परि-स्थितीनेंच तिची पारख केलेली दिसते—तिला सहाय्य करणें हेंच आपलें कर्तव्य आहे !

—त्याचें पाऊल भराभर पडूं लागलें. इतका वेळ चाललेला त्याचा मानसिक छळ आतां संपुष्टात आला होता.

---

# ६ गाईची गोष्ट

मोरूकाकांची बुधी गाय व्याली तेव्हां त्यांच्या दिनूला कोण आनंद झाला ! त्याला वासरांचें विलक्षण वेड होतें. कोणत्या मुलाला नसतें ? पण बुधीचें वासरूं फारच फक्कड होतें. पिकलेल्या गवतासारखा त्याचा रंग होता आणि त्याच्या अंगावरचे टिपक्यांचे पुंजके अश्विन-कार्तिकांतल्या गवतावर त्याच्या फुलांचे झुबके जसे दिसतात तसे दिसत. त्याच्या भालप्रदेशावर पारिजातकाचीं तीनचार ताजीं फुलेंच कोणी ठेवून दिलीं होतीं ! त्याचे डोळे काळेभोर होते–रानांतल्या गवतावर नाचणारे दोन भुंगेच जणु !

तें जितकें गोड होतें तितकेंच अवखळ होतें. लहान वासरें असतातच. एखाद्या थोर सात्त्विक व्यक्तीच्या खोडकर कोट्या जशा विशेष आल्हादकारक वाटतात, तशीं गाईसारख्या सात्त्विक प्राण्याच्या पोटीं आलेलीं हीं वासरें वाटतात. पण बुधीचें वासरूं फारच खोडकर होतें. सदोदित वारा प्यालेलें ! त्याला अंगणांत आणून सोडलें कीं, क्षणभर तें गप्प राही–नुसते आपले दोन कान, एखाद्यानें खुणा कराव्या तसे, खालीं, वर, मागें पुढें करी. या जगांत आपल्याला आणून सोडणाऱ्याला तें खुणांनीं त्याचा वृत्तांतच कळवीत होतें कीं काय नकळे ! हें संदेश-वाहन चालू असतांनाच वाऱ्यानें तें चौखुर उडे आणि अंगणाच्या एका बाजूला जाऊन जमीन हुंगूं लागे. जणुं तें या जगाचे गुणदोषच जाणून घेत असे – आणि एकदम जगाच्या दुष्टतेचा वास लागल्यामुळेंच कीं काय, पुन्हां चौखुर उडून दुसरीकडे जाई ! दिनूशीं त्याचें फारच सूत जमलें होतें. तो दूर उभा राहून त्याला बोट पुढें करून बोलवी. तें एकेक पाऊल पुढें टाकीत येई

आणि त्याचें बोट हुंगण्याचा प्रयत्न करी—हुंगतां हुंगतां त्याच्या बोटाचा स्पर्श झाला कीं तें पुनः उडे. कधीं कधीं एकादें लहान मूल आईच्या पदराला धरून लपंडाव खेळतें, तसें तें आपल्या आईच्या पलीकडे जाई आणि तिच्या पोटाखालून पाहूं लागे. सकाळीं लुचून झालें म्हणजे त्याच्या या खेळास विशेषच भरती येई.

मोरूकाकांच्या वाड्यांत नर्मदी नांवाची एक फार गुणी गाय होऊन गेली होती. तिचेंच नाव या पाडीला ठेवलें.

पण नर्मदी दुर्दैवी ! तिला या जगांत येऊन वीस एक दिवस झाले, तोंच बुधीला अचानक वाखा झाला. ती गवताची काडीसुद्धां खाईनाशी झाली. तिचें रवंथही बंद झालें. हां हां म्हणतांना तिचें पोट पिपासारखें फुगलें. मोरूकाकांनीं खूप उपाय केले—पण दोन दिवसांत तिला ओढून काढावी लागली !

× × ×

आतां नर्मदीचें कसें होणार ? दोन दिवस तिला वरचें दूध पाजण्याचा प्रयत्न झाला, पण वाहत्या पाण्यांतली वनस्पति घातलल्या पाण्यांत जशी मरगळूं लागते, तसें तिचें झालें. दोन दिवसात तिचा नूर पार पालटला. अवखळपणा साफ पळाला. दिवसभर मान टाकून ती पडून राहूं लागली. मोरूकाकाना वाटलें, हिलाहि आईचाच रोग झाला. पण संध्याकाळच्या सुमारास ती रवंथ करीत आहे, असें दिनूला आढळलें. त्याला कोण आनंद झाला ! तावडतोब तो उठला आणि त्यानें थोडा कोवळा लुसलुशित पाला आणून तिला भरविण्यास सुरवात केली. पण ती चाचरत–चाचरतच खात होती.

वरचें दूध आणि भरविलेला पाला यांनीं कांहीं तिचा मुळचा तजेला परत येईना.

हिला एखाद्या दुसत्या गाईलाच लावलें पाहिजे—मोरूकाकांच्या ध्यानांत आलें. पण दुसरी कोणती गाय तिला लुचूं देणार ? गाय ही गरीब मोन

जात खरी. पण गरीबपणाच्या माणसाच्या कल्पना ती स्वतःवर लादून घ्यायला तयार नसते. मात्र मोरूकाकांच्या वाड्यांत एक गाय अशी होती. पुढ्यांत आंबोण ठेवलें, म्हणजे ओटीला वासरूं लागलें आहे कीं शेरडूं याची ती फिकीर करीत नसे. पण यदा ती भाकड होती. तिच्या आचळां-तून अमृत निघायचें चैत्रांतच बंद झालें होतें.

दुसरी एक गाय होती. श्रावणी !

× × ×

श्रावणी ? अरे बाप रे !

श्रावणी म्हणजे अवदसा ! सदा सुकट, मरतुकडी दिसणारी, निस्तेज राखेसारख्या रंगाची ही गाय महाद्वाड होती ! तिच्या शिंगांचेहि कधीं पटलें नाहीं—एक उभें आणि दुसरें आडवें, दोरीच्या गांठीसारखें गुरफटलेलें तिचा स्वभाव या शिंगासारखा होता. माणसाचें न् तिचें जणुं जन्मवैरच होतें. कोणी गरीबसें दिसलें कीं, अंगावर धावून जायची ! चोरून खाण्यांत पटाईत ! आज कोणाच्या मळणींत शिरून दाणे खाल्ले, काल कोणाची वई मोडून फुलझाडांत शिरली—अशा सारख्या कागाळ्या ऐकूं यत. 'अजून कशी गचकली नाय् पटकीला !' 'कशी नाय् नेलीन् वाघानं !' असें कोणाचें तरी तिच्या नांवानें तोंड वाजलेलें दिवसांतून एकदां तरी ऐकूं येत असे. जणुं कोणी लावसटच आपलें देणें उगवून घ्यायला तिच्या रूपानें आली होती !

उभ्या आयुष्यांत एकच सत्कृत्य तिनें केलें होतें. एकदां ती ओटी-वरच्या खोलींत शिरून पाटींतली पेंड खाऊं लागली. इतक्यांत कोणाचासा पायरव लागला. सटकन् वाऱ्यानें उडवावें तशी ती तेथून उडाली ! पण खोलीच्या दारांत वर्षभराचा दिनू झोंपलेला होता, त्याला काडीएवढा धक्का तिनें लावला नाहीं. जातांना नि येतांना त्याच्या अंगावरून अलगद उडी मारून ती गेली होती !

तिचा आणखी एक गुण होता. तिला दूध बऱ्यापैकी होतें. पण तिचें दूध काढायला जाणें म्हणजे स्वतःच्या हाडांची मोळी बांधायची तयारी

करूनच जाणें ! ती केव्हां बिथरेल, थयथय नाचूं लागेल आणि सटासट लाथा मारूं लागेल, याचा कांहीं नेम नव्हता. तिच्या लाथा मारण्यांत एक खुबी होती. वासरूं एका बाजूनें पीत असतांनाच तिचें दूध काढावें लागे आणि ती लाथ मारी ती अशी कीं, वासराला चुकूनही लागूं नये आणि दूध काढणाराच्या हातावर मात्र ती नेमकी बसावी! तिची लाथ बसली कीं हाताचीं बोटें बोरूचे कांडे मोडतें तशीं मोडून पडताहेत कीं काय असें वाटे!

या भावणीला दुसऱ्या गाईचें वासरूं लावायचें म्हणजे एक दिव्यच ! पण तें करणें भाग होतें. दोन तीन दिवसांत नर्मदीची दशा उडाली होती ती अगदीं वाळली. तिचं नाचणें बागडणें बंद झालें. आणि एकाद्या जरत्कारू रेडकाप्रमाणें मान टाकून ती पडून राहू लागली.

तिची ती अवस्था पाहावेना. तिला भावणीला लावायचें, असें मोरूकाकांनीं ठरविलें.

× × ×

त्या दिवशीं संध्याकाळींच हा प्रयोग सुरू झाला.

मोरूकाकांनीं भावणीचे पाय बांधले. पुढ्यांत आंबोण ठेवलें. एका बाजूनें तिचें वासरूं सोडलें. त्यानें जरा वेळ दूध खाल्ल्यावर ती चांगली रसरशित पान्हावली आणि मोरूकाकांनीं नर्मदीला आणलें. तिला हें काय चाललेलें आहे कांहीं समजेना. मोरूकाकांनीं तिचें तोंड भावणीच्या आंचळा-कडे नेलें. भावणी थोडी अस्वस्थ झाली, पण तिच्या पुढचें आंबोण अजून शिल्लक होतें पण नर्मदीच लुचायला सुरवात करी ना. गाईचें वासरूं उपजल्याबरोबर प्रथम आईचे आचळ शोधतें, पण आईखेरीज इतर गाईच्या ओटीला लागावें, ही गोष्ट निसर्गानें त्याला शिकवलली नसते, कांहीं वासरें ही चोरटी विद्या शिकतात, पण तीं बहुधा मानवाचा व्यवहार पाहूनच! नर्मदीला अद्याप जगाचें इतकें ज्ञान झालें नव्हतें. मोरूकाकांनीं तिचें मुस्कट भावणीच्या ओटीपाशीं नेलें, तरी ती आंचळांना तोंड लावी ना. पण भावणीचें वासरूं दुसऱ्या बाजूनें दुसक्या मारमारून लुचत होतें. त्याचें तोंडून फेंस गळत होता. त्याचा वास आल्यावर या साऱ्या खटपटीचा अर्थ नर्मदीला

समजला की काय नकळे, तिनें थोडें तोंड उघडलें आणि चांचरत चांचरतच श्रावणीच्या आंचळ तोंडांत घेण्याचा प्रयत्न केला. नर्मदीच्या तोंडाचा स्पर्श आंचळांना झाला मात्र, श्रावणीनें मागच्या बांधलेल्या दोनहि पायांनीं अशी कांहीं सटकन् लाथ मारली की त्याबरोबर तिचें स्वत:चें वासरूं आणि नर्मदी हीं तर दूर उडालींच, पण ती स्वत:च एकदम कोलमडून पडली.

दिनू जरा दूर उभा राहून हें पहात होता, तो एकदम ' अग आई ' करून ओरडला !

मोरूकाका चांगलेच हट्टी होते. आणि श्रावणीवर तर सर्वांचाच राग ! ' उद्यां पाहतों कसं लुचवीत नाहीं ती ! — तिचा बाप लुचविल ! ' असें म्हणत त्यांनीं श्रावणीच्या पुढ्यातलें आंबोण खासकन् ओढून घेतलें !

दुसऱ्या दिवशीं श्रावणीला खोडा घालायचें त्यांनीं ठरविलें. त्यांनीं तिचे पाय वर आणि खालीं असे दोन ठिकाणीं बांधले. तिच्या दोनहि बाजूला दोन दोन बांबू पुढच्या गळ्हाणीला व मागच्या बळवटाला घट्ट बांधले. पुढल्याहि पायात दोर अडकविला. पुढ्यात आंबोणाचें घमेलें ठेवलें आणि स्वत: भलीथोरली काठी घेऊन तिच्या समोर उभे राहिले.

दिनूनें वासरें सोडून आणलीं.

नर्मदीच्या तोंडाचा स्पर्श तिच्या आंचळांना झाला मात्र, तिनें एकदम बैठकच मारण्याचा प्रयत्न केला पण तिला घातलेला खोडा पक्का होता. तिला बसतांच येईना. तिचा नाइलाज झाला. तिला उभें राहणें भागच होतें. दोनहि वासरें दोबाजूंनीं लुचूं लागलीं. पण श्रावणीच्या अंगाला इंगळ्या डसत असाव्यात. ती एकदम कावरीबावरी झाली. रागीट नजरेनें इकडे तिकडे पाहूं लागली. एकादा काळाकाळट मणी स्वत:भोंवतीं फिरावा तसे तिचे डोळे दिसूं लागले. नाकानें मोठमोठे सुस्कार सोडूं लागली. अखेरीस ती विलक्षण चिडली—आणि मोठ्यानें ओरडली !

त्याबरोबर मोरूकाकांनीं हातांतल्या काठीनें तिच्या पाठीवर जोराचा सपाटा लगावला !

' नका मारूं काका ! ' असें दिनू एकदम म्हणाला–पण मनांतल्या मनांत ! तो इतका घाबरला होता कीं त्याच्या तोंडून शब्द फुटलाच नाहीं !

वासरेंहि बावरलीं—पण लगेच पुनः लुचू लागलीं !

बिचारी श्रावणी ! निमूटपणें एका परक्या वासराला पाजीत उभी राहिली. तिच्या हातांत एकच उपाय होता. तिनें पान्हा चोरला !

पण रोज रोज पान्हा थोडाच चोरतां येतो !

दुसऱ्या तिसऱ्या दिवसापासून त्या दोन वासरांना पुरेसें दूध मिळू लागलें. नर्मदी पुनः तजेल दिसू लागली.

असे पंधरा वीस दिवस चाललें.

× × ×

आज मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा. गुरांची दिवाळी. दुपारीं गुरांना उडे घालतांनाच आज श्रावणीला खोडा न घालतां वासरांना दूध पाजावें असा विचार मोरूकाकांच्या मनांत आला. संध्याकाळीं तिचे नुसते मागचे पाय बांधून त्यांनीं वासरांना लुचायला सोडलें. वासरांनीं श्रावणीच्या आचळांना तोंड लावल्याबरोबर ती अशी कांहीं झपाट्यानें उडाली कीं तीं दोन वासरें बाजूला कोलमडलीं. पण आतां तीं धीट झालीं होतीं. दोघेंहि उठलीं आणि पुनः लुचायला सरसावलीं. त्याबरोबर श्रावणीनें थयथय नाचायला सुरवात केली. एखादी कडकलक्ष्मी गोलगोल नाचते तशी ती नाचू लागली. मोरूकाका संतापले. त्यांच्या हातांत निगडीचा फोक होता. त्यांनीं तिच्या पाठीवर बदाबद पंधरावीस फटके मारले. एखादें यंत्र चालावें तसे त्यांचे हात चालत होते. पण श्रावणी त्यानें ताळ्यावर आली नाहीं—उलट ती भयंकर चवताळली !

त्या दिवशीं कोणालाच दूध मिळालें नाहीं. श्रावणीच्या शिरावर लोकांकडून होणाऱ्या शिव्यांच्या वर्षावांत वेंचक भर टाकीत मोरूकाकांनीं वासरें नेऊन बांधलीं.

त्या दिवशीं बहुधा रात्रीं एकाएकी श्रावणी हंबरडा फोडूं लागली. तिचें वासरूंहि इकडे ओरडूं लागलें. श्रावणीच्या हंबरण्यांत एक प्रकारचा केविलवाणेपणाच मोरूकाकांना भासला. असला करुण हंबरडा श्रावणीकडून त्यांनीं कधीं ऐकला नव्हता. कोणी वाघरूंबिघरूं वाड्यात शिरलें कीं काय, अशी शंका त्यांच्या मनांत आली. ते लगेच कंदील घेऊन धांवले. ते गेल्याबरोबर श्रावणीने त्यांच्याकडे लाचार नजरेने पाहिलें. इतर गुरें स्वस्थपणें रवंथ करीत बसलीं होतीं, त्या अर्थी वाघबिघ कांहीं नाहीं, हे मोरूकाकांच्या तत्काळ ध्यानांत आलें. श्रावणीलाच कांहीं झालें कीं काय, म्हणून ते कंदीलाच्या प्रकाशात तिच्या सर्वांगाची तपासणी करूं लागले. ते असे कंदिल फिरवून पाहत असतांना श्रावणी त्यांच्याकडे अधिकाधिक लाचार नजरेने पाहत होती. मोरूकाकांना वाईट वाटलें. आज दिवाळीच्या दिवशीं तरी आपण तिला असें झोडपून काढायला नको होतें, असा विचार त्यांच्या मनांत आला. हा विचार मनात येतो न येतो तोंच त्याचें श्रावणीच्या ओटीकडे लक्ष गेलें. तिचे आचळ फुगून चांगले टरारले होते–शिजवलेल्या आटलाप्रमाणें दिसत होते. मोरूकाका समजले. तिच्या ओटीला तडस लागला होता. त्यांनीं लगेच श्रावणीचें वासरू–तें एकटेंच–आणलें. वासरूं लुचूं लागल्याबरोबर श्रावणी एकदम पान्हावली आणि आसुसलेल्या जिभेनें त्याचें अंग चाटूं लागली.

तें दृश्य पाहून मोरूकाकांना फार आनंद झाला—आणि श्रावणी व तिचें वासरूं यांचें हें सुख रोज हिरावून घेतल्याबद्दल त्यांना थोडा पश्चात्तापहि झाला.

पण त्याचा इलाज नव्हता. नर्मदीसारख्या गोजिरवाण्या वासराचा विचार करणें भाग होतें. दुसऱ्या दिवसापासून श्रावणीचा खोडा पुनः सुरू झाला !

× × ×

यानंतर सुमारें दीड महिना गेला. एक दिवस श्रावणीचें वासरूं अचानकपणें मेलें. त्याला काय भावना झाली होती हें नीटसें कोणाला कळलेंच

नाहीं. रात्रीं तें नीटसें लुचलें नाहीं—आणि सकाळीं मोरूकाका त्याला लुचण्यासाठीं सोडायला गेले तों तें ताठ होऊन पडलें होतें. तें मेलें म्हणून फारसें वाईट कोणालाच वाटलें नाहीं. तें होतेंच तसें हाडकुळें, बेढब आणि पोटेन्यें!

पण आतां नर्मदीला दूध कसें मिळायचें! तिला एकटीला श्रावणी लुचूं देईल?—नांवच नको!

दारचा गडी म्हणाला, वासरूं मेलें हें श्रावणीला कळवूंच नये – आपलें पोर मेलें असें कळलें की ती दूध पार आटवील.

मोरूकाकांना पटलें. त्यांनीं वासराला ओढून टाकण्यापूर्वी श्रावणीला तें दाखविलेंच नाहीं—आणि तिलाहि दिवसभर कावणांतून सोडलें नाहीं.

सकाळीं तिचें दूध काढलेंच नाहीं. थोड्या वेळानें तिनें हंबरण्यास सुरवात केली. आपल्या हंबरण्यास वासरानें साद दिली नाहीं म्हणून, कीं असें ठाणबंद बांधून राहणें तिला जन्मांत ठाऊन नव्हतें म्हणून, तिचा हंबरडा अधिक अधिक आवेगाचा होऊं लागला. मोरूकाकांनीं तिच्या पुढ्यांत नेऊन थोडी ताजी नाचणीची काड टाकली. पण तिनें तिकडे ढुकून पाहिलें नाहीं. दिनू मधुनमधून येऊन तिच्याकडे दुःखी मुद्रेनें पाही. पण तिचें ओरडणें बंद कसें करावें, हें त्याला ठाऊक नव्हतें.

नर्मदीला लुचायला सोडावें, असें मोरूकाकांच्या मनांत आलें. पण श्रावणीचें वासरूं नसतांना नर्मदीला लुचवणें हें केवढें बिकट कार्य आहे, हें जाणणें कठिण नव्हतें. बराच वेळ दूध न काढतां ओटींत दूध सांचूं दिलें तर श्रावणी कदाचित् लुचूं देईल, असा विचार त्यांनीं केला आणि नर्मदीला सोडलें नाहीं.

इकडे श्रावणीनें हंबरून–ओरडून जीव नकोसा केला. ती अंगांत आल्याप्रमाणें नाचत होती.

अखेरीस संध्याकाळच्या सुमारास मोरूकाकांनीं नर्मदीच्या नशिबाची

परीक्षा पाह्यचें ठरविलें. ते कावणांत गेले. श्रावणीला त्यांनीं खोडा घातला. मागचे पुढचे पाय बांधले, पुढें आंबोण ठेवलें आणि नर्मदीला लुचायला सोडलें.

श्रावणी आपल्या वासराकरतां कावऱ्याबावऱ्या नजरेनें इकडे तिकडे पाहूं लागली. तें कोठें दिसेना आणि नर्मदी एकटीच लुचूं लागली. श्रावणी अशी कांहीं भयंकर बिथरली! तिनें सटकन् लाथेला हिसडा दिला, आणि काय नर्मदीचें नशिब! –तिच्या पायाचा दोर ताटकन् तुटला! नर्मदीच्या तोंडावर असा कांहीं तडाखा बसला कीं, तें बिचारें वासरू दूरच झालें! पुनः श्रावणीकडे वळेना!

'नशिब तिचीचं!' असे उद्गार काढून मोरूकाकानीं नर्मदीला नेऊन आपल्या जागीं बांधून ठेवलें आणि ते इतर उद्योगास गेले.

काय असेल तें असो, श्रावणीचें ओरडणें नंतर जरा कमी झालें. थोड्या वेळानें बहुतेक थांबलेंच. मधूनच ती जराशी ओरडे.

आज संकष्टी होती. चंद्रदर्शन होऊन मोरूकाका जेवायला बसले होते. जेवण आटपत येतें आहे, तोंच श्रावणीनें मोठ्यानें हंबरायला सुरवात केली. तिच्या हंबरण्यांत तोच दीड महिन्यापूर्वीचा केविलवाणा सूर ऐकूं आला. मोरूकाका उठले आणि कंदिल घेऊन कावणांत गेले. त्यांनीं गेल्या-बरोबर तिच्या आंचळाकडे नजर टाकली. आंचळ टरारून आले होते. मोरूकाकानीं मुकाट्यानें तिला खोडा घातला, पाय आवळले, समोर आंबोण ठेवलें—आणि नर्मदीला लुचायला सोडलें.

नर्मदी थोडी बाचकतच पण गेली. तिनें जाऊन आंचळ तोंडात घेतला. त्याबरोबर श्रावणी धडपड करूं लागली. पण आतां खोडा घट्ट बांधलेला होता आणि पाय करकचून आवळलेले होते. नर्मदी चांगली धीट होऊन खसाखसा लुचूं लागली...

—आणि श्रावणी एकदम पान्हावली! तिचें अंग जरा सैल पडलें. ओटी थोडी मोकळी झाली.

—आणि थोड्याच वेळांत श्रावणी मनापासून आंबोण खाते आहे व नर्मदी ढुसक्या मारून तिला लुचते आहे, असें दृश्य दिसूं लागलें.

हवेंत कोवळी थंडी पसरली होती. दिनू शरीर थोडें आंखडून घेऊन तें दृश्य पाहत राहिला.

मोरुकाकांनीं एक समाधानाची नजर कावणाबाहेर टाकली—

बाहेर चतुर्थीचा चंद्र पृथ्वीवर दुग्धवर्षाव करीत होता !

---

## ७ आगगाडीचे रूळ

मालतीशीं आपण लग्न ठरविलें आहे असें मकरन्दानें सांगतांच विमला-वैनींचा चेहरा एकदम उतरला. इतका वेळ उत्साहानें बोलणारी त्यांची वाणी तत्काळ बंद पडली. त्या निश्चल पण शून्य नजरेनें समोर पाहत राहिल्या. पाहतां पाहतांच त्यांच्या डोळ्यांत पाणी जमा झालें.

त्यांचा हात पदराच्या टोकाकडे गेला, पण लगेच त्या उठल्या आणि घाईघाईनें आपल्या खोलींत निघून गेल्या.

खोलींत गेल्याबरोबर त्यांनीं आपलें अंग बिछान्यावर टाकून दिलें—आणि त्यांना हुंदका आला. पण त्यांनीं आपलें तोंड घट्ट आवळलें, हुंदका आंतल्या आंत गिळला आणि ओठ घट्ट दाबून त्या तशाच पडल्या. त्यांच्या मनांतली खळबळ त्यांच्या ओठांची थरथर व्यक्त करीत होती. जरा वेळानें ती थरथरहि कमी झाली. त्यांची नजर भूतकाळांत शिरली. तिच्या समोर त्यांच्या जीवनाचा सारा लांबलचक प्रवास उभा राहिला. ज्या आग-गाडीच्या रुळांशीं त्यांच्या जीवनाचें निकट साहचर्य, त्यांच्या शेजारून जाणाऱ्या सिग्नलच्या तारेप्रमाणें जडलें होतें ते रूळ, उन्हांत चमकणाऱ्या त्यांच्या प्रकाशरेषा, त्यांच्यावर पडणारी हिरव्या तांबड्या सिग्नलांची लकाकी, सांधा बदलला म्हणजे येणारा खाटकन् आवाज, सारें कांहीं त्यांच्या दृष्टीसमोर उभे राहिलें.

चौदा पंधराव्या वर्षी त्यांचें लग्न झालें आणि त्यांची त्या रूळांशीं संगति जडली. त्यांचा नवरा दिनकर रेल्वेंत नोकर होता. एका आड स्टेशनवर

त्याला नोकरी होती. लग्न करून त्यानें त्यांना तेथें आणलें. दुपारीं जेवणें होऊन तो कामावर गेला कीं घरीं अगदीं एकटें एकटें होई. दोन माणसांचें काम तें कितीसें असणार ! शेजार असाहि फारसा नव्हता. पोर्टरच्या घरांत एक बाईमाणूस होतें. पण ती दुपारीं कोठेंशी कामाला निघून जाई. चार वाजतां दिनकर चहा घेऊन गेला म्हणजे त्यांना अगदीं काम नसे. मग त्या आपल्या खोलीच्या दाराशीं उभ्या राहत आणि आगगाडीच्या रुळांकडे टक लावून पाहत बसत. साडेचार वाजतां एक मेलगाडी तेथून जाई, तिनें ही सवय त्यांना लावली. त्यांचे वडील एका गांवीं पोस्टमास्तर होते. मेलगाडीचा पोस्टाचा लाललाल डबा त्यांच्या समोरून धाडधाड करीत गेला म्हणजे त्यांचा जीव उचंबळत असे. त्यांचें मन डब्याबरोबर माहेरीं जाई. ती गाडी ज्या दिशेकडे जाई तिकडे त्या निश्चल दृष्टीनें पाहत बसत. हळुहळू ती आगगाडी दृष्टीआड होई आणि तिचे रूळ मात्र डोळ्यापुढें शिल्लक राहत. सूर्यप्रकाशांतली त्या रूळांची चकाकी त्यांना वेध लावी. त्या कितीतरी वेळ त्या रूळाकडेच पाहत बसत. त्यांत त्यांचा वेळ कसा जाई हें त्यांचें त्यांनाच समजत नसे. कांहीं दिवसांनी त्या रूळांभोंवतीं त्यांनीं आपलें एक स्वतंत्र विश्वच निर्माण केलें. त्या विश्वांत त्या तासन् तास रमून जात. दुपारच्या उन्हात ते रूळ चमकूं लागले म्हणजे त्या तेजाच्या रेघांशीं त्यांची नजर खेळत राही. संध्याकाळच्या वाऱ्यात रुळापलीकडील गुल्मोहराच्या फांदांची हालती सावली त्या रूळांवर नाचूं लागली कीं त्यांचें मन तिच्याशीं शिवाशिवीचा खेळ खेळे. एकाद वेळेस एखादी बकरी येऊन चार पाय जुळवून त्या रुळावर उभी राहिली आणि कान टवकारून पाहू लागली म्हणजे, लहानपणीं रस्त्यालगतच्या तारांवर पाय जुळवून उभें राहण्याचा आणि तोल राखण्याचा खेळ त्यांनीं जो अनेकदां केला होता, त्याची त्यांना आठवण होई. सिग्नलची खेंचाखेंच झाली आणि त्या रुळांशेजारची सिग्नलची तार थरथर कांपूं लागली म्हणजे आपल्या आंतहि कसली तरी थरथर होते आहे असें त्यांना वाटे. मग त्या विनाकारणच अस्वस्थ होत आणि त्यांची तंद्री भंग पावे.

वर्षभरानें दिनकरनें आपला भाऊ मकरन्द याला शिक्षणासाठीं आणला आणि मग मात्र त्यांना आपल्या या विश्वाचा थोडा थोडा विसर पडूं लागला. मकरन्द त्यांच्याहून चारपांच वर्षांनींच लहान होता. त्याच्याशीं खेळण्याबोलण्यांत त्यांचा बराच वेळ जाऊं लागला.

आणि एक दिवस मकरन्दानें त्यांच्या जीवनांत संपूर्णतः प्रवेश केला.

—त्या दिवशीं दिनकर तापानें फणफणूनच घरीं आला. दोन दिवसांत कसला ताप आहे हें डॉक्टरांना कळण्यापूर्वींच, त्यानें जगाचा निरोप घेतला. विमलावहिनींना सारे जग गोठल्यासारखें झालें. त्यांची दृष्टि हलेना. तोंडांतून रडें फुटेना. शब्द बाहेर पडेना. त्या जागच्या जागीं खिळल्याप्रमाणें बसून राहिल्या. इतक्यांत मकरन्द शाळेतून घरीं आला. घरचें दृश्य पाहून त्यानें एकदम 'दादा' असा हंबरडा फोडला आणि वैनींच्या गळ्याला जाऊन मिठी मारली. वैनींनीं एकदम त्याला पोटाशीं धरलें-आणि त्यांना वाचा फुटली, त्या रडूं लागल्या.

बराच वेळ तीं एकमेकांना धरून रडत होतीं. मग वैनी एकदम थांबल्या. त्यांना आंत कसली तरी चमत्कारिक शांतता वाटूं लागली. मकरन्दाला पोटाशीं धरून बसण्यांत समाधानाची कांहीं तरी अननुभूत प्रतीति येत आहे असें त्यांना वाटलें. लहानपणींच आपली लहान भावंडें पोटाशीं धरून त्या अनेकदां हसल्या, खेळल्या, रडल्याहि होत्या. लहानपणींच आई वारल्यामुळें लहान भावंडाशीं त्या विशेष निगडित झाल्या होत्या. पण आतां आकाश कोसळून पडलेलें असतांना, मकरन्दला पोटाशीं धरून रडण्यांत त्यांना जें समाधान, जो आंतरिक आधार लाभला —या दुःखांतच जें एक आश्रयस्थान सांपडलें, तसा अनुभव त्यांना पूर्वीं कधीं आला नव्हता. त्यांना मकरन्दाबद्दल कांहीं तरी सर्वस्वी नवीन असें वाटूं लागलें. त्यांनीं त्याला जरा दूर केलें, त्याच्या रडव्या चेहऱ्याकडे थोडें निश्चल नजरेनें पाहिलें, पदरानें त्याचे डोळे पुसले, त्याचें तोंड कुरवाळलें आणि त्याला पुढ्यांत घेऊन त्या आडव्या झाल्या—

त्या भानावर आल्या तेव्हां त्यांचें जग बदललेलें होतें.

काहीं दिवसांनीं त्या एका लहानशा गांवांत राहायला आल्या. दिनकरच्या विम्याचे पैसे आले. घरची थोडी शेती होती तीहि त्यांनीं विकली. आणि या पैशाच्या आधारावर त्यांनीं मकरन्दासह नव्या आयुष्यास सुरुवात केली. नवरा वारल्यानंतर त्यांना माहेरीं नेऊन त्यांचें शिक्षण पुरें करण्याचा विचार त्यांच्या वडिलांनीं त्यांच्यापुढें मांडला, पण त्यांनीं वडिलांना नकार दिला. माहेरीं जाणें म्हणजे मकरन्दाला वाऱ्यावर सोडणें होतें. तो विचारहि त्यांच्या मनाला स्पर्श करू शकत नव्हता. मकरन्दाचा त्याग त्या करूं शकत नव्हत्या. त्याच्याशिवाय स्वतःच्या जीवनाचा विचार करणेंहि त्यांना अशक्य वाटूं लागलें. कधीं मकरन्दाखेरीज आयुष्याचीं कल्पनाचित्रें त्या रेखाटत, पण अशा वेळीं आपल्या समोरून एकादी रिकामी उघड्या डब्याची भकास मालगाडी खडखड करी जात आहे आणि ती कांहीं केल्या संपत नाहीं असा त्यांना भास होई.

काय वाटत होतें त्यांना मकरन्दाविषयीं, तें त्यांचें त्यांनाच सांगतां येत नव्हतें. एवढें मात्र खरें कीं त्यांना आपल्या धाकट्या भावाबद्दल नवऱ्याबद्दल, अगदीं कोणाबद्दल कधीं कांहीं वाटलें नाहीं असें कांहीं तरी मकरन्दाबद्दल वाटत होतें. मकरन्द हाच त्यांच्या जीवनाचा अर्थ बनला होता— पण त्याचा अन्वयार्थ त्या लावूं शकत नव्हत्या.

मकरन्दाला सोडून आपलें स्वतंत्र जीवन आखण्याची कल्पना त्यांना शिवली नव्हती. मकरन्दाच्या जीवनांतच जणु त्यांनीं आपलें जीवन मिसळलें होतें. त्यांची नजर मकरन्दाच्या मूर्तीबरोबर फिरत असे. त्याच्या सुखांत त्या आपलं सुख शोधीत होत्या. त्याच्या आनंदाबरोबर त्या आनंदित होत, त्याच्या दुःखानें त्या विषण्ण होत. मकरन्द त्यांच्याशिवाय असा फारसा कधीं राहिलाच नव्हता, पण तो स्काऊटच्या कॅपला जाई तेव्हां त्यांना फार उदास, कंटाळवाणें वाटत असे. तो मॅट्रिकची परीक्षा पास होऊन एक स्कॉलरशिप मिळवून घरीं आला तेव्हां त्यांच्या अंतःकरणांतला सारा अभिमान त्यांच्या चेहऱ्यावर उमटला होता. तो एकदां टायफॉईडच्या तापांत बरळूं लागला तेव्हां त्याच्या प्रत्येक शब्दागणिक त्यांचा

जीव कासावीस झाला होता. मकरन्दाच्या जीवनापेक्षां आपले जीवन काहीं वेगळें आहे असेंच त्यांना वाटेनासें झालें होतें.

स्वतःच्या सुखासाठीं सुद्धां मकरन्दाला सोडून जाण्याची त्यांची तयारी नव्हती.

अगदीं अलीकडची, मकरन्द असिस्टंट जेलर होऊन इंदूरला आल्या-नंतरची गोष्ट. गोखले नांवाच्या गृहस्थाशीं मकरन्दाची ओळख झाली आणि दोस्तीहि जडली. जिमखान्यांत जडलेली दोस्ती. तिच्यांत एक बेछूट मस्ती होती. गोखले मकरन्दाकडे वारंवार येत. मकरन्दाशीं बोलतांना त्यांच्या आवाजांत एक प्रकारचा आडदांडपणा असे. पण वनींशीं बोलतांना तो कोठें तरी दूर पळे. एक प्रकारचें मार्दव, सभ्यता त्यांत लगेच दृग्गोचर होई. त्यांच्या वागण्यांत अतिशय अदबी निर्माण होई. स्त्रियांशीं वागतांना पुरुष अर्थात् असेच वागणार, पण हळुहळू गोखल्यांच्या वागण्यांत एक प्रकारची निराळीच आस्था, आवाजांत निराळाच ओलावा आणि नजरेंत वेगळीच ओढ आहे असें वैनींच्या प्रत्ययास येऊं लागलें. पण वैनींना ती अस्वाभा-विक वाटली नाहीं; अगर त्यांच्या वर्तनाचा तिटकाराहि आला नाहीं. गोखल्यांच्या एकंदर हालचालींत जो मर्द रुबाब होता तो त्यांना मुळांतच आवडलेला होता, आणि त्यांच्याबद्दल अनुकूल ग्रह त्यांच्या मनांत निर्माणच झालेला होता. लवकरच त्या अनुकूलपणाला एक प्रकारचें घरोब्याचें आणि सौहार्दाचें स्वरूप आलें. मकरन्द व गोखले दिवाणखान्यांत बोलत बसले म्हणजे वैनी तेथें येऊन शिवण-टिपण करीत बसत. केव्हां केव्हां त्यांच्या संभाषणांत सामीलहि होत.

गोखले होळकर स्टेट रेल्वेंत नोकरीला होते. कधीं कधीं ते आपल्या ऑफिसांतल्या गंमती सांगत. यावेळीं वैनींना दिनकरची अंधुक अस्पष्ट अशी आठवण होई—पण तिच्यांत विषादाच्या छटा क्वचितच मिसळलेल्या असत.

एक दिवस सायंकाळीं गोखले आले तेव्हां मकरन्द घरीं नव्हता.

वैनींनींच त्यांचें स्वागत केलें. आणि त्या त्यांच्याशीं बोलत बसल्या. बोलतां बोलतां गोखल्यांनीं आपण लवकरच प्रवासाला जाणार असें सांगितलें आणि विचारलें,

" बोला, तुम्ही येतां का ? "

" आम्ही ! " वैनींनीं विचारलें, " तुमचं ठीक आहे हो. तुम्हांला रेल्वेकडून फुकट पास मिळतात. तुम्ही प्रवासाची चैन करूं शकतां. आमचं तसं नाहीं. "

" पण माझ्यापाशीं दोन पास आहेत, " गोखले उत्तरले. त्यांचा आवाज थोडा भेदक होता.

' दोन पास ' असें गोखले म्हणाले तेव्हां ते आपल्याला एकट्याला बोलावीत आहेत हें वैनींच्या लक्षांत आलें. त्या एकदम अस्वस्थ झाल्या. थोडा वेळ थांबून विषयाला थोडी कलाटणी देण्यासाठीं त्यांनीं विचारलें,

" तुम्ही प्रवासाला नेहमीं एकट्यानंच जातां ? "

" आजवर एकट्यानं गेलों. आतां तुमची संमति असेल तर दोघांनीं जाऊं " गोखले म्हणाले आणि ते एकदम गप्प बसले. त्या गप्प बसण्यांत एक प्रकारचा खंडितपणा वैनींना जाणवला. त्यांनीं गोखल्यांकडे पाहिलें तों ते आपल्याकडे रोखून बघताहेत आणि त्यांच्या नजरेंत विलक्षण ओढ आहे हें त्यांच्या ध्यानांत आलें. त्या अधिकच अस्वस्थ झाल्या. आपलीं कानशिलें आणि कानाच्या पाळ्या गरम गरम होत आहेत असें त्यांना वाटलें. हातापायांत कसली तरी चमत्कारिक अशक्तता शिरत असलेली भासली. काय बोलावें हें त्यांना सुचेना. इतक्यांत मकरन्द आला. त्याचें निमित्त करून त्या आंत गेल्या.

गोखल्यांच्या त्या उद्गारांनीं त्या अस्वस्थ झाल्या, पण आपल्या अस्वस्थपणांत एक गोड शिरशिरी अनुभवास येत असलेलीहि त्यांना जाणवली. आपलें सारें शरीर कसल्यातरी आवेगानें भरलें आहे आणि तें हलकें हलकें

होत आहे असें त्यांना वाटूं लागलें.

गोखले थोडा वेळ बसून निघून गेले. ते मकरन्दाशीं फारसें बोलले नाहींत हें वैनींच्या ध्यानांत आलें. मकरन्द आंत आला तेव्हां आपण त्याच्याशीं नेहमींप्रमाणें मोकळ्या मनानें बोलूं शकत नाहीं अशी विचित्र जाणीव त्यांना झाली ती लपविण्यासाठीं कीं काय, त्या मकरन्दाशीं बोलूं लागल्या–पण आपण कांहींवाहींच बोलत आहोंत असें सारखें त्यांना वाटत होतें.

त्या वेळेपासून गोखल्यांच्या प्रवासाचा विचार त्यांच्या मनांत अधून मधून घोळू लागला. पण आपल्या–मकरन्दाच्या जीवनांत कसला तरी विसंवाद निर्माण होत आहेसें जेव्हां जेव्हां त्यांना भासे तेव्हां तेव्हां त्यांना जो अनुभव येई तोच याहि वेळीं आला. ते आगगाडीचे रूळ त्यांच्या नजरेसमोर नाचूं लागले. ज्या ज्या वेळीं त्यांच्या मनांत गोखल्यांच्या प्रवासाचे विचार येत त्या त्या वेळीं क्षितिजाच्या पलीकडे जात असलेले ते रेल्वेचे रूळ, त्यांवरून धावणारी मेलगाडी त्यांना दिसू लागे आणि ती दूर दूर जात टिंबाएवढी बनून अखेर अदृश्य होई !

प्रवासास जाण्यापूर्वी गोखले एकदोनदां त्यांच्याकडे येऊन गेले. ते आले म्हणजे आपला जीव अगदीं तरल बनतो आहे असें त्यांच्या अनुभवास येई. गोखले प्रवासाबद्दल मात्र कधींच बोलले नाहींत. त्याहि बोलल्या नाहींत. तो विषय तीं दोघें टाळींतच होतीं.

चार दिवसांनीं गोखले प्रवासाला गेले. प्रवासांतून त्यांचें एक पत्र आलें. आपण गोखल्यांबरोबर गेलों असतों तर मकरन्दाला आपण असेंच पत्र पाठविलें असतें, त्यांच्या मनांत विचार आला. तो विचार त्यांना चमत्कारिक वाटला. आपण हें घर सोडून गेलों आहोंत आणि मकरन्द या घरांत एकटाच वावरतो आहे, असें दृश्य त्यांच्या नजरेपुढें उभें राहिलें त्यांना तें फार विचित्र वाटलें. गोखल्यांबरोबर जाण्याचा खरा अर्थ पूर्वी त्यांना कधीं जाणवला नव्हता अशा आतां जाणवला. गोखल्यांबरोबर

जाणें म्हणजे मकरन्दाशीं ताटातूट. तो विचार असह्य होता. गोळ्यांचा विषय मनांतून काढून टाकण्याच्या उद्योगास त्या लागल्या.

पण मकरन्दच एक दिवस स्वत: होऊन दूर जाण्याचा प्रयत्न करणार नाहीं काय ? तो लग्न करणार नाहीं काय ! मकरन्दाच्या लग्नाचा विचार त्यांना इतका तापदायक वाटला कीं मनांत आल्याबरोबर तो मनांतून साफ काढून टाकण्याचा प्रयत्न त्या करूं लागल्या. पण त्याबरोबर तो विचार त्यांना अधिक अधिक त्रस्त करूं लागला. आणि त्या त्याच्याशीं अधिक अधिक झगडत होत्या.

आजवर त्यांनीं हा झगडा अनेकदां केला होता. त्याला अनेक रूपेंहि प्राप्त झालीं होतीं. पण आज हा सारा झगडा फुकट जात होता. मकरन्दानें मालतीशीं लग्न ठरल्याचें सांगितलें तेव्हांचा त्याचा थंड निश्चयाचा आवाज त्यांना पुन: जाणवला. त्या एकदम विकल झाल्या आणि असहायपणें अश्रू ढाळूं लागल्या.

× × ×

असें कांहीं तरी होईल याची कल्पना आपल्या लग्नाची बातमी वैनींना सांगतांना — मकरन्दाला होतीच. वैनी खोलींत निघून गेल्यावर तो बाहेर व्हरांड्यांत आला, आरामखुर्चीवर पडला आणि त्यानें एक सिगारेट पेटविली. भारावलेल्या नजरेनें तो सिगरेट ओढूं लागला. बराच वेळ तो शून्य नजरेनें सिगारेटच्या धुराकडे पाहत होता. जरा वेळानें त्याला स्वत:ची थोडथोडी जाणीव होऊं लागली. त्याला वैनींचा खूप राग आला होता. त्याच्या अंत:करणांत आज कसकसलीं स्वप्नें उमलत होती—आणि वैनी त्यांच्यावर राख फेकीत होत्या !

रागातिशयामुळें त्याला पुन: सुचेनासें झालें. बाहेर मैदानांत पोरें क्रिकेट खेळत होतीं. त्यांच्याकडे तो शून्य नजरेनें पाहत राहिला पाहत पाहतां आपल्या मनावरचा ताण कमी होत आहे, आपला राग मावळत

आहे, वैनीविषयीं आपुलकीची भावना आपल्या अंतरंगांत संचरूं लागली आहे असें कांहीं तरी त्याला वाटूं लागलें. त्याची नजर क्रिकेट पाहत होती आणि त्याच्या मनांत स्मृतींची कसलीतरी चाळवाचाळव सुरू होती. हळुहळू त्याला तो प्रसंग आठवला —

दिनकर वारल्यानंतर तीनचार महिन्यांतलाच तो प्रसंग. मकरन्द मुलां-बरोबर क्रिकेट खेळत होता. पायाला पॅड वगैरे कांहीं नव्हतेंच. खेळतां खेळतां चेंडू पायाच्या नळीवर बसला आणि मकरन्द एकदम कळवळून खालीं बसला. आठ दहा दिवस तो अंथरुणांत होता त्यावेळी वैनींनीं त्याची जी शुश्रूषा केली तिनें त्याचें त्याला एक नवें दर्शनच घडलें. त्याचा पाय अति-शय दुखत असे. प्रत्येक वेदनेबरोबर तो कळवळे. त्यावेळीं ती वेदना वैनींच्या दृष्टींत उमटली आहे असें त्याला दिसे. दिनकर गेल्यावर त्याला मोठा धक्का बसला होता. त्याला एकदम निराधार वाटायला लागलें होतें. आपल्या मनाचें भिंग फुटलें आहे असें कांहींतरी त्याला वाटत असे. पण या दुख-ण्यांतील वैनींच्या वर्तणुकीनें त्याला आधार सांपडला. त्याचें मन सांधलें. एका अपूर्व बंधनानें तो वैनींकडे ओढला गेला.

वैनी त्याला किती प्रेमळपणानें वागवत! सकाळीं त्याला उठविण्याकरतां त्यांचा प्रेमळ हात त्याच्या मुखावर फिरे तेव्हां आपल्या चेहऱ्यावर कोणीतरी फूल फिरवीत आहे असें त्याला वाटे. जागें झाल्याबरोबर त्याची नजर त्यांच्या हंसऱ्या नजरेला भेटली म्हणजे त्याचें हृदय आनंदानें उलून येई आणि त्या आनंदांत त्याचा सबंध दिवस जाई. त्याचें खाणेंपिणें साधेंच असे, पण वैनींनीं त्यांत अमृत ओतलें होतें. दुपारचा चहा वैनींनीं मकरन्द शाळेंतून आल्याखेरीज कधीं घेतला नाहीं. परीक्षा आली कीं तो चूर, गंभीर बनत असे, विषण्णतेनें त्याचें मन व्यापलें जाई. वैनीहि त्यावेळीं गंभीर बनत, पण मुद्दाम हंसून खेळून त्या त्याला आनंदित करण्याचा प्रयत्न करीत. परीक्षा आटोपल्यावर त्याच्या आनंदाच्या ज्या हरिणउड्या पडत त्यांच्या-बरोबर वैनींचाहि जीव नाचतो आहे असें त्याच्या अनुभवास येई.

दिनकर गेल्यावर त्यांच्या बिऱ्हाडांत गरिबीच शिरली. इन्श्युरन्सचे आणि शेतीचे पैसे किती दिवस पुरणार ? पण वैनी शिवणकाम शिकल्या–आणि इकडचेंतिकडचें शिवणकाम करून त्यांनीं संसारांतले उन्हाळेपावसाळे तरून जाण्याचा मोठ्या धैर्यानें आणि नेटानें प्रयत्न केला. वार लावण्याची इच्छा एकदां मकरन्दानें व्यक्त केली, पण त्यांनीं ती लगेच मोडून काढली. कॉलेजांत गेल्यावर त्याला स्कॉलर्शिप्स वगैरे मिळूं लागल्या. त्यानें एकदोन शिकवण्याहि धरल्या. पण एकदां एक महत्त्वाचें पुस्तक घेण्यास त्याजपाशीं पैसे नव्हते. वैनींना हें कळल्याबरोबर त्यांच्या डोळ्यांत पाणी उभें राहिलें. मुकाट्यानें त्या आपला एक उरलासरला दागिना घेऊन सराफाकडे गेल्या आणि तो मोडून त्यांनीं पुस्तकाची किंमत उभी केली.

वैनी या मकरन्दाला आई, बहिण, मैत्रीण –सर्व कांहीं झाल्या होत्या. वैनींव्यतिरिक्त जीवनाचा विचार त्याच्याहि मनाला कधीं शिवला नव्हता.

पण त्याला एक मुलगी सांगून आली आणि त्या प्रकरणीं वैनी ज्या वागल्या त्यानें त्याच्या भावनांना जबरदस्त धक्का दिला. त्याच्या शेजारीं, स्नेहलता गंजमध्येंच, सरवटे नांवाचे एक गृहस्थ होते. त्यांची शांता नांवाची एक भाची होती. मकरन्दानें ती करावी अशी त्यांची फार इच्छा होती आणि तसें त्यांनीं त्याला एकदां बोलूनहि दाखविलें होतें. दिवाळीच्या सुटींत ती त्यांच्याकडे आल्यावर एक दिवस संध्याकाळीं फिरायला जातांना ते तिला घेऊन मुळीं त्याच्याकडेच आले. शांता आलेली पाहून वैनी नाराज झालेल्या दिसल्या. पण मकरन्दाला यांत विशेष कांहीं वाटलें नाहीं. नवीन सुशिक्षित मुलींशीं वैनींना नीट वागतांच येत नाहीं अशी त्याची समजूत झाली होती. कॉलेजांत असतांना त्याच्या वर्गातील एक विद्यार्थिनी मिस् लवांदे त्याच्या घरीं येई तेव्हां त्या थिजल्यागत वागत हे त्याला माहित होत. कदाचित सरवट्यांची मुलगी दाखविण्यांत ही नवीन पद्धति वैनींना पसत न पडल्यामुळें त्या नाराज झाल्या असतील असेंहि वाटलें. पण या नवीन अनौपचारिक ओळखी-मुळेंच तो खूष होऊन गेला होता. शिवाय शान्ता त्याला आवडली

होती. तिचें मोजकें वागणें आणि मोजकें बोलणें त्याला पसंत होतें. ती दिसायला अधिक नीटस असती तर त्यानें मुळीं विचार केला नसता. पण नकार देण्याचा विचार त्याच्या मनांत आला नव्हता. तिच्याशीं थोडा अधिक परिचय झाल्यावर मनाचा कांटा कुणीकडे कलतो तें पाहायचें त्यानें ठरविलें होतें. म्हणून पाताळपाण्याची ट्रिप ठरवून एक दिवस तिच्या संगतींतहि त्यानें काढला. तिच्या मोजक्या वागण्यांत जी एक प्रतिष्ठा दिसली ती त्याला फार आवडली. त्याच्या मनांत होकार ठरूं लागला. इतक्यांत ट्रिपच्या दुसऱ्याच दिवशीं खुद्द शांताचेंच त्याला एक पत्र आलें आणि तें वाचून तो चकित होऊन गेला. शान्तानें लिहिलें होत,

" सा. न. वि.

मामांनीं मला तुमच्या संगतींत आणून तुम्हाला आणि तुमच्या वैनींना जो त्रास दिला त्याबद्दल क्षमा मागण्यासाठीं मी हें पत्र लिहीत आहे. वैनी माझ्याशीं फारशा कधीं वागल्या-बोलल्या नाहींत. मला वाटलें, त्यांचा तो स्वभावच असेल. पण पाताळपाण्याच्या ट्रिपच्या वेळीं त्यांचा मला उलट अनुभव आला. त्या पुष्कळच आस्थेनें वागल्या आणि बऱ्याच बोलल्या. त्यामुळें माझ्यावर खरोखर जन्माचे उपकार झाले आणि त्याबद्दल मी त्यांची शतशः आभारी आहे. त्या काय काय बोलल्या तें सारें सांगण्याची गरज नाहीं. मुख्य तें तेवढें सांगतें. आपण आगगाडीच्या रस्त्यानें काळा-कुण्डाकडे जातांना मध्येंच चोरलनदीच्या पात्रांत उतरून विश्रांति घेतली ना, तेव्हां त्या म्हणाल्या. ' माझं जीवन या चोरल नदीसारखंच आहे. ही पाताळपाण्याच्या ठिकाणीं कोसळते तशीच मी एकदां कड्यावरून कोस-ळलें. कांहीं काळ माझ्या जीवनाचा अगदीं चुगडा झाला. मी कुठं तरी कशी तरी वाहवत गेलें असतें, पण मकरन्दामुळें सावरलें. या आगगाडीच्या रस्त्यामुळें आज आपण चोरल नदीची चवकशी करतों आहोंत ना ! तसेंच मकरन्दामुळें माझ्या आयुष्याचें झालं आहे. ' तुमच्या वैनी इतक्या थोर कवयित्री असतील याची मला कल्पना नव्हती. त्यांचें हें काव्य माझ्या दृष्टीनें फारच महत्त्वाचें आहे. तुम्ही आतां मी अगर माझ्यासारखी दुसरी

कोणी यांचा नाद सोडून आपल्या वैनींचेंच काव्य फुलविण्याचा प्रयत्न केलात तर काव्यावर आणि जगावर आपले फार उपकार होतील.

—शान्ता सप्रे "

शान्ताच्या पत्रांतील उपरोधाने मकरन्दचें काळीज कापत गेलें. त्याला वैनींचा फार राग आला. त्यांचें चमत्कारीक वागणें आणि असलें चमत्कारीक बोलणें त्याला अगदीं गैर वाटलें. आजवर मनानें तो वैनींपासून कधीं दूर गेला नव्हता. तो प्रथमच या प्रकरणामुळें जाऊं लागला. वैनींबद्दल थोडेसे तिऱ्हाईतपणाचे विचार त्याच्या मनांत येऊं लागले. आजवर आपण एक प्रकारें वैनींच्या अंकितच होतों याची जाणीव त्याला होऊं लागली आणि ती जाणीव त्याला थोडीशीं तापदायक वाटू लागली. लग्नाचे विचार त्याच्या मनांत अधिक जोरानें उसळू लागले. पण शान्ताच्या नकारानें तो फारसा त्रस्त झाला नाहीं. तिच्या पत्रानें त्याला जो धक्का दिला, त्यानें त्याला अशी जाणीव आणून दिली कीं शान्ता आपल्याला कितीहि आवडली असली तरी तिच्यावर आपलें अंतःकरणापासून प्रेम नाहीं. तिच्या पत्रानें त्याला खूप मनस्ताप झाला, पण तिच्या नकारानें आंत कोठें तरी सुटकेची छटाहि उमटत आहे असें त्याला जाणवलें. पण या पत्रामुळें लग्नाचे विचार त्याचें मन अधिक व्यापूं लागले.

आणि लवकरच त्याच्या मनाला ओढ लावील अशी मुलगी त्याला भेटली. आर. एस. एसचा सत्याग्रह सुरू झाला आणि त्याच्या तुरुंगांत बरेचसे कैदी आले. एक दिवस एका कैद्याला भेटायला एक तरुण मुलगी आली. भावाला भेटण्याची रीतसर परवानगी घेण्यासाठीं ती त्याच्याकडे आली तेव्हांच तिच्या ठसठशीत बोलण्यानें आणि तडेल वागणुकीनें तिनें त्याचें लक्ष वेधलें होतें. भावाशीं तिची मुलाखत झाली तेव्हांचें त्यांचें बोलणें जें त्याच्या कानांवर पडलें त्यानें तर त्याचें मनच जिंकलें. तिचा भाऊ तिला बाहेरून कांहीं तरी आणून द्यायला सांगत होता. त्यावर ती ठाशीव स्वरांत म्हणाली, " मी असें कांहीं करणार नाहीं. तुम्ही स्वतःला

सत्याग्रही म्हणवतां ना रे ! मग जेलच्या शिस्तीनं नको का वागायला ?" हे उद्गार ऐकल्याबरोबर मकरन्द त्यांच्यासमोर आला आणि तिच्याकडे प्रेमळ कौतुकाच्या नजरेनें पाहत राहिला. त्या नजरेंत आतुरता होती. ती मालतीला जाणवल्यामुळें की काय ती एकदम लाजली आणि तिची नजर खालीं जमिनीला खिळली. तिचा चेहरा एकदम लाल लाल झाला. त्यानें तिला कचेरींत बोलावलें आणि तिच्या भावाला नियमानुसार शक्य त्या सान्या सवलती आपण देऊं असें आश्वासन दिलें. त्या मुलाखतींतच त्यांच्यामध्ये भावनेचा एक नाजुक धागा निर्माण झाला आणि पुढें प्रत्येक मुलाखतीच्या वेळीं त्याला रेशमाच्या गांठी पडत गेल्या. अखेरीस त्यांनीं विवाहबद्ध व्हायचें ठरविलें.

मकरन्दानें लग्न करावयाचें ठरविलें आणि आजवर आपण खरोखर किती परतंत्र होतों याची त्याला तीव्र जाणीव झाली. वैनींच्या मायेच्या पाशांनीं आपल्याला गुलामच बनविलें होतें असें त्याला वाटलें. आतां आपण सांगितलेली बातमी ऐकून वैनींना जें वाटलें तें पाहून आपल्या गुलामगिरीची जाणीव त्याला विशेषच झाली. वैनींचा त्याला फारच राग आला. त्या रागामुळें तो संत्रस्त झाला. त्याला कांहीं सुचेना. त्या विमनस्क स्थितींतच तो व्हरांड्यांतच बसून राहिला.

इतक्यांत तुरुंगांत तास वाजला. त्यानें तो भानावर आला. त्यानें पाहिलें. समोर तुरुंगाच्या भिंती पसरल्या होत्या. त्या भिंती आतांसारख्या भकास आणि भयानक त्याला कधींच वाटल्या नव्हत्या. तुरुंगाचा दरवाजा उघडला होता. त्यांतून अनेकदां तो आंत बाहेर गेला होता. पण त्याचा क्रूरपणा त्याला आतांच जाणवला. बाहेरच्या बागेंत काम करणाऱ्या कैद्यांना त्या दरवाजांतून आंत नेण्यांत येत होतें. त्यांच्या पायांतले साखळदंड वाजत होते. साखळदंडांनीं कैदी कसे जखडले जात असतील याची या वेळीं त्याला खरी कल्पना आली. साखळदंडांनीं कैद्यांच्या हातापायांना जे घट्टे पडतात ते एकदम त्याला आठवले. आपल्या मनाला असेच घट्टे पडले आहेत असें त्याला वाटलें.

मकरन्द एकदम आवेगानें उठला. त्यानें हाताची जोरानें हालचाल केली. जणु कसल्या तरी शृंखला तोडण्याचा ते प्रयत्न करीत होते. त्यानें समोर पाहिलें. झाडांच्या सावल्या तुरुंगांच्या भिंतीवर पडल्या होत्या आणि त्यांची संध्याकाळच्या वाऱ्यांतील शयनाच भेडसावीत होती. त्याची नजर इकडे तिकडे फिरली.

हिंवाळ्यानें सृष्टि किती करपून-आकसून गेली आहे तें त्याच्या ध्यानांत आलें. मेंदीच्या कुंपणावर धुळीचे थर बसलेले जाणवले.

तो उठला. आंत गेला. त्यानें कपडे केले आणि तिरीमिरीच्या पावलानें तो घराबाहेर पडला.

× × ×

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मकरन्द जेवला गेल्यानंतर मालती त्याच्या घरीं आली. ती येणार हें त्याला ठाऊक होतें. न आली तर बरें असेंहि कालपासून त्याला वाटत होतें. पण येऊं नको असें तो तिला कळवूं शकत नव्हता. तिची वाट पाहून अस्वस्थ मनानेंच तो नोकरीवर गेला आणि ती दहासाडेदहाच्या बेताला आली. ती येणार हें वैनींना माहित नव्हतें. त्यांनीं तिला पाहिलेलेंहि नव्हतें. पण ती आल्याबरोबर ती कोण असेल हें त्यांनीं ओळखलें. तिला पाहिल्याबरोबर त्यांची नजर तिच्यावर आपाद-मस्तक फिरली. पण लगेच त्यांनीं आपला चेहरा फुलविला आणि हंसून तिचें स्वागत केलें. तिची उठबस केली, तिला सर्व माहिती विचारली, तिला चहा करून दिला, तिला घरभर फिरवून सर्व वस्तू दाखविल्या, मकरन्दाच्या आवडीनिवडीबद्दल त्या बोलल्या आणि त्यांनीं तिला पहिल्या भेटीची ओळख म्हणून एक उंची खण दिला. मालती खूष होऊन गेली. मकरन्दाच्या घरांत फिरतांना, त्याच्या घरांतल्या वस्तू पाहतांना ती उत्साहानें न्हाऊन निघत होती. पावसाळ्यांत गुलमोहराच्या झाडावर पालवीच्या नवनव्या लहरी पसरतात तशा तिच्या अंतःकरणांत प्रसन्नतेच्या पसरत होत्या. या घरांतील वास्तव्याचीं मोहक स्वप्नें तिच्या नजरेवर तरळूं लागलीं. दीडदोन तासांनीं ती तरल पावलांनीं निघून गेली.

ती गेल्याबरोबर विमलावैनींनीं कपडे बदलले. लग्नांत वडिलांकडून त्यांना जें लुगडें मिळालें होतें तें त्या नेसल्या. नंतर मकरन्दाच्या खोलींत गेल्या आणि मकरन्दाच्या पॅडमध्यें पुढील मजकूर लिहिला–

" प्रिय मकरन्द,

कालपासून माझ्या अंतःकरणाच्या एका भागाला हात घालून कोणी तरी तें तोडून नेत आहे असें मला वाटत आहे. आजवर तुझें आयुष्य हा मी माझ्या आयुष्याचा भागच मानीत आलें. पण आतां त्याच्यावर ताबा मागणारें दुसरेंच एक माणूस तू आणलें आहेस. खरें म्हणजे मी तुझें अभिनंदन केलें पाहिजे. पण मला नाहीं करतां येत तें. हरकत नाहीं. आजवर तुझें सुख तेंच मी माझें सुख मानलें. आतां तुझ्या सुखासाठींच मला येथून निघून गेलें पाहिजे.

तुझी

वैनी "

त्या चप्पल घालून बाहेर पडल्या आणि त्यांची नजर समोरच्या पिंपळाकडे गेली. पिंपळावरची बहुतेक पानें गळून गेली आहेत हें त्यांच्या ध्यानांत आलें. जीं थोडींबहुत होतीं तीं पिकलीं होतीं, वठलीं होतीं. त्या जुनाट पिंपळाची एक फांदी मोडून पडली होती. तिचा मुकट–राखट भाग त्यांना जाणवला. त्या रस्त्यावर आल्या आणि उन्हाळयाच्या आगमनाची चाहुल त्याना लागली. इतक्यांत बुरुंगापलीकडून रेल्वेच्या इंजिनाची शिटी त्यांच्या कानांत शिरली–आणि त्यांना एकदम ते आगगाडीचे रूळ आठवले. पण ते रूळ आतां सरळ नव्हते. त्यांनीं वेडेवांकडे अनेक आकार धारण केले होते. त्याचा त्यांना निटसा बोधहि होत नव्हता. मध्येंच ते दिसत–अस्पष्ट दिसत आणि नाहींसे होत. आणि मग जरा वेळ कांहीं दिसेनासें होई. मध्येंच एकदम ते रूळ वर्तुलाकार झाले, तिकडून मेलगाडी धडधड करीत आली आणि त्यांच्यावर स्वतःभोवतीं वाटोळी वाटोळी फिरत राहिली. वैनींना धक्का बसल्यासारखें झालें. त्यांच्या शेजारून रस्त्यावर एक लॉरी धाड-धाड करीत गेली. त्या तशाच अबोधपणें चालत होत्या. पुनः त्यांच्या दृष्टी-पुढें ते रूळ आले आणि आतां त्यांना दोरीला गांठ पडते तशी गांठ पडली.

बरा वेळानें ते नेहमींसारखे सरळ झाले. पण आतां त्यांच्यावर सिग्नलचा हिरवा व तांबडा असे दोनहि रंग एकदम नाचूं लागले आणि त्यांतून एक विचित्रच रंग निर्माण झाला. त्यानें त्यांची नजर दिपली आणि त्यांना कांहींच दिसेनासें झालें. त्या तशाच चालत होत्या. इतक्यांत त्यांना रुळावर एक शेळी चार पाय जोडून उभी राहिली आहे आणि शेजारची सिग्नलची तार तिच्या पायाभोंवतीं गुंडाळत आहे असें दिसलें. त्या दृश्याचें त्यांना हंसून आलें. त्या थोड्याशा भानावर आल्या. रस्त्यावर आपल्या बाजूनें गिरणीचे मजूर जात येत आहेत असें त्यांच्या ध्यानांत आलें. त्या झपाझप पावलें टाकूं लागल्या. त्यांच्या पायांत गति शिरली. रस्त्यावरच्या माणसांची जाणीव अंधुक होऊं लागली. त्या बराच वेळ तशाच निर्बोध चालत होत्या. कांहीं वेळानें आपण रेल्वेलाइनीच्या बाजूनें चालत आहोंत असें त्यांच्या ध्यानांत आलें. त्या एकदम उभ्या राहिल्या. त्यांनीं समोर पसरलेल्या आगगाडीच्या रस्त्याकडे पाहिलें. रस्त्यावरचे रूळ समोर सरळ गेले होते—आणि क्षितिजावर एकमेकांत मिसळून नाहींसे झाले होते. दुपारच्या उन्हांतली त्यांची चमक मात्र भासत होती. बराच वेळ त्या उभ्या राहून निश्चल नजरेनें ती चमक पाहत होत्या. हळूहळू त्या चालूं लागल्या. त्यांचें पाऊल पुढें पडे, तसें तें क्षितिज पुढें सरकूं लागलें—

आणि क्षितिजावर एकमेकांत मिसळून नाहींशा होणाऱ्या रुळांची चमकहि पुढें सरकूं लागली !

---

# ८ बीजेची चंद्रकोर

पदरानें डोळे पुशीतच उमा ओवाळणीची तयारी करीत होती. कपाटा-तून तबक काढीपर्यंत तिनें अश्रू कसेबसें आवरून धरले होते, पण तें दृष्टीस पडल्यापासून तिच्या डोळ्यांना धार लागली होती. तबक, निरंजन, अक्षता यांच्यावर तिच्या दुःखाचे पाणी पडत होतें. तिनें निरंजन लावलें तेव्हां तिच्या डोळ्यांतले अश्रू एकदम डबडबले-आणि क्षणभर सारें जग तिला अस्थिर, अस्पष्ट झालें !

काकूंच्याहि डोळ्यांतून अश्रू ठिपकूं लागले. हातातलें काम तसेंच टाकून त्या खाली बसल्या आणि अश्रू ढाळूं लागल्या. वहिनी तेथें नव्हत्या त्या बाहेरच्या खोलींत श्रीकान्ताला चंद्रज्योति उजळून दाखवीत होत्या.

उमानें तबक तयार केलें आणि तें घेऊन ती गॅलरींत आली. आल्याबरोबर तिनें आपली अश्रुपूर्ण नजर आकाशाकडे वळविली. काळ-सर-निळ्या आकाशांत दोन फिकट रंगांचे तुकडे तरंगत होते. पण तिकडे तिचें फारसें लक्ष नव्हतें. ती चंद्रकोर शोधीत होती. ती दिव्हपा-बरोबर ओवाळण्यासाठीं तिनें तबक वर उचललें.

पण ती नीटशी ओवाळूं शकली नाहीं. तिचे हात थरथरत होते. तबक थरथरत होतें. आणि निरंजनांतली वाऱ्यानें मागें वळूं पाहणारी ज्योतहि

थरथरत होती. उमेनें अक्षत आकाशाच्या दिशेनें भिरकावली, चंद्राला करेंबसें ओवाळलें आणि ती खालीं बसून स्फुंदू लागली.

बराच वेळ ती स्फुंदून स्फुंदून रडत होती. रडतां रडतांच ती स्वतःला आवरण्याचाहि प्रयत्न करीत होती. थोडे अश्रू आवरून तिनें वर बघितलें. चंद्रकोर आतां खालीं उतरली होती. ढगाचा एक तुकडा तिच्या-वरून बाजूला होऊन क्षितिजाकडे जात होता. चंद्राच्या वरच्या बाजूसच एक चांदणी लुकलुकत होती. अश्रूंनीं भरलेल्या उमेच्या डोळयांना ती निरंजनांतल्या ज्योतीसारखी दिसली. तिनें डोळे पुसले आणि ती चंद्राकडे पाहूं लागली. जरा निरखून पाहू लागली. चंद्रकोर आतां एका वर्तुळांत दिसूं लागली. चंद्राच्या पूर्णबिंबाची तेजस्वी कडा—तेजाचें एक वलयच तिला दिसूं लागलं. आकाशांतून खालीं भूमीवर अलंकार टाकणाऱ्या यक्ष-अप्सरांच्या नि देवदेवतांच्या कथा तिनें वाचलेल्या होत्या. तेजस्वी वलयांतली ती चंद्रकोर— इंद्राच्या बोटांतून गळालेली तेजाची आंगठीच येथें आकाशांत येऊन लटकली कीं काय असें तिला वाटलें तिनें झटकन् आपल्या डाव्या हाताकडे पाहिलें. हाताच्या बोटांत एक हिऱ्याची आंगठी होती. आंगठीकडे लक्ष गेल्याबरोबर तिच्या डोळयांत पुन्हां अश्रू गोळा झाले. अश्रू ढाळतां ढाळतांच तिच्या नजरेसमोर गतवर्षींचा प्रसंग तरळूं लागला.

× × ×

तो भाऊबीजेचाच दिवस होता. तिच्या मकरंददादानें दिवाळीसाठीं आणलेली साडी ती आज प्रथमच नेसली होती. परकर सोडून पहिल्या-प्रथमच साडी नेसल्यावर मुलीच्या मनांत, आज आपण मोठे झालों, आपला दर्जा आतां वाढला असे जे भाव निर्माण होतात, आणि तारुण्याच्या क्षितिजावरच्या छटांचें दर्शन झाल्यामुळें जी एक प्रकारची कोमल हुरहूर अंतरंगांत निर्माण होते——तो सारा अनुभव उमेलाहि येत होता. साडी नेसल्यापासून ती अगदीं खुशींत होती, पण आज तिनें आपल्या आनंदाची उघळपट्टी केली नव्हती, तर ती तो आंतल्या आंत सांठविण्याचा

प्रयत्न करीत होती, आणि तो आनंद तिच्या नेत्रावाटें बाहेर पडूं लागल्यामुळें कीं काय तिचे तेजस्वी डोळे विशेष तेजस्वी दिसत होते. ‘ आज उमेचा सारा आनंद तिच्या डोळ्यांत जमा झाला आहे ’ असे मकरंददादानें सकाळीं उद्गार काढल्यापासून तिच्या आनंदांत अमृत ओतलें गेलें होतें. काकूसुद्धां तिच्याकडे आज सारख्या कौतुकानें पहात होत्या. वहिनींनीं मात्र तिच्या साडीकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. आणि तेवढें तिला थोडेसें खुपत होतें. वहिनींची ही वृत्ति नवीन नव्हती. उमा ही मकरंदाची मानलेली बहिण हें ती कधीं विसरूं शकली नाहीं. उमाबरोबरच्या तिच्या बोलण्यांत एक प्रकारचा रुक्षपणा होता. तिच्या बघण्यांतहि रोषाच्या सूक्ष्म छटा आढळत. पण उमाला त्याची सवय झाली होती, आणि तितकें थोडेंबहुत दुर्लक्ष करण्यासहि ती शिकली होती. म्हणून आपल्या साडीचें वहिनीनें अगदी थंड स्वागत केलें याचें तिला तितकेंसें वाटलं नाहीं.—आणि जें काय वाटले होतें तें त्या लव्हेंडर रंगाच्या जॉर्जेटच्या साडीमुळें झालेल्या आनंदांत पार बुडून गेलें होतें !

मैत्रिणीच्या घरचीं दिवाळीचीं निमंत्रणें स्वीकारण्यांत आणि त्यांना साडी दाखविण्यांत संध्याकाळ केव्हां संपली हें उमाच्या ध्यानांतच आलें नाहीं. घाईघाईनें ती घरीं आली नि तिनें ओवाळणीची तयारी केली—व ती मकरंद-दादाची वाट पहात बसली. मकरंद आज दुपारींच वहिनीला व बाळाला घेऊन सासुरवाडीस गेला होता. संध्याकाळीं लवकरच तो आपल्याकडून ओवाळून घ्यायला येईल अशी उमाची कल्पना होती. ओवाळणीचें तबक तयार करून ती त्याची वाट पहात बसली. आठ, साडे आठ वाजले तरी मकरंद आला नाही; तेव्हां फटाके उडवून वेळ काढण्याचा प्रयत्न ती करूं लागली. अखेरीस नऊ वाजले, साडे नऊ वाजले तरी दादाचा पत्ता नाहीं. उमा अगदीं कंटाळून गेली. मकरंदाचा तिला राग आला. मध्येंच काकूंशीं जाऊन कांहीं तरी बोलण्याचा ती यत्न करी. पण तें ओढून ताणून आण-लेलें बोलणें सुरू होण्यापूर्वींच तुटे ! अखेर ती मकरंदाच्या खोलीत गेली आणि टेबलाचा खण उघडून तिनें फोटोचा आल्बम बाहेर काढला. वेळ

बाईनासा झाला म्हणजे हा आल्बम पहात राहाण्याची तिची संवय होती. पाहून पाहून तो तिला अगदीं पाठ झाला होता. आज ती कोठें तरी उघ-डीत होती आणि उघडेल त्या फोटोकडे बराच वेळ शून्य दृष्टीनें पहात रहात होती. पहातां पहातां एक फोटोवर तिची दृष्टि खिळली. तो मकरंदाचा मुंजीतला मातृभोजनाचा फोटो होता. काकू आणि मकरंद एका ताटांत जेवायला बसलीं होती. काकू समोर आपल्या टपोऱ्या स्निग्ध डोळयांनीं पाहात होत्या व मकरंद खालीं बघून जेवत होता. काकूंचे डोळे आजहि तसेच होते. मकरंदाचा मुंडवळया बांधलेला आणि क्षौर केलेला चेहरा पाहून उमाला खूप मौज वाटली. पूर्वी अनेकदां ती वाटली असूनहि आज पुन्हां वाटली. तिच्या जिवणीची कळी एकदम हास्यानें उमलली त्या फोटोची तिला गंमत वाटतां वाटतांच तिची स्मृति चाळवली. तिला एक भाऊ होता. मुंज झाल्यावर थोडयाच दिवसांनी तो वारला. उमा तेव्हां अगदीं लहान होती. त्याचा मुंडवळया बांधलेला वाटोळाच चेहरा—तेवढीच त्याची अंधुकशी आठवण तिला होती. तो चेहरा आतां तिच्या नजरेसमोर आला. पूर्वी केव्हां केव्हां तिला तो आठवला होता. पण त्याच्याबद्दल आजच्या इतकी आपुलकी तिला कधीं वाटली नव्हती. या आठवणीच्या तंद्रीतच आल्बमची पानें उलटतां उलटतां तिचा व मकरंदचा बागेंत घेतलेला एक फोटो होता. त्याच्याकडे तिचें लक्ष वेधलें. मकरंददादानें आपल्याला आणल्यानंतर लवकरच हा फोटो काढला होता हें तिला आठवलें. ती तेव्हां अगदीं लहान होती व तिचा फ्रॉक थोडा आंखूड होता त्यामुळें ती अधिकच लहान दिसत होती. ती मकरंदाच्या पुढ्यांत त्याला अगदीं बिलगुनच उभी होती. सूर्याचे किरण डोळयांत शिरल्यामुळें तिचे डोळे कसे विचित्रच, अर्धमिटले झाले होते. आपल्या फोटोला ती आपणच हंसली आणि आल्बमची पुढली पानें चाळू लागली. मकरंदाच्या लग्नातल्या फोटोचें पान तिनें उघडलें. उभय-पक्षांकडील मंडळीचा तो एकत्र फोटो होता. उमाला आठवलें, आपल्या मनातून मकरंददादा शेजारी उभें राहायचें होतें, पण दादा स्वतःतच्या वाढून गेला होता आणि फोटोसाठीं मुलांना बसविण्याची कामगिरी

आपल्याकडे येणाऱ्या वहिनीकडील एका राकट इसमानें आपल्याला कुठेंतरी कोपऱ्यांत बसविलें. त्यावेळीं उमाला आलेला राग तिच्या चेहऱ्यावर उमटला होता— आणि आतां तिला तो विशेषच जाणवला ! नंतरचे फोटो निरनिराळ्या स्थळांचे होते. त्यांतले कांहीं मिरजेच्या हॉस्पिटलमधले होते. मकरंद तेथे कांहीं दिवस मेडिकल ऑफिसर होता. तेथेंच आपल्या आईनें आपल्याला मकरंददादाच्या पदरांत टाकलें–या विचाराबरोबर ती अस्वस्थ झाली व तिने आल्बम मिटून खणांत नेऊन ठेवला. नंतर तिनें घड्याळाकडे पाहिलें. साडे दहा वाजले होते. अजून दादाचा पत्ता नव्हता. तिचे डोळे भरून आले. काय करावें तें तिला सुचेना. ती काकूकडे गेली आणि तिनें विचारलें, " आई, दादा केव्हां ग येणार ? "

" माहेरच्या माणसांकडून वैनींची सुटका होईल तेव्हां " काकूंच्या आवाजांत रोष होता. उमाची तगमग त्या पहात होत्या. त्यांनाहि राग आला होता.

काकूंचें उत्तर ऐकल्याबरोबर उमाला रडूं कोसळलें तिला एकटें एकटें वाटूं लागलें. तीन वर्षें पूर्वी तिची आई वारली तेव्हां ती एकटी झाली पण मकरंदानें तिला कधीं एकटें वाटूं दिलें नव्हतें. ' मला बहिण नाहीं' मी अगदीं पाठच्या बहिणी प्रमाणें तिचं पालन करीन, तुम्ही कांहीं काळजी करूं नका ' असें मकरंदानें तिच्या आईला वचन दिलें होतें. आणि आजपर्यंत तें कटाक्षानें पाळलें होते. जगांत आपण अगदीं एकटें आहोंत, आपलें असें अगदीं कोणी नाहीं, हा अनुभव किती दारुण असतो याची तिला कल्पना नव्हती. पण आतां, अकस्मात हा तिला अनुभव आला. त्या अनुभवाच्या आवेगांत ती उठली. स्वयंपाकघरांत गेली, देवासमोरचें ओवाळणीचें तबक तिनें उचललें आणि ती चंद्राला ओवाळण्यासाठीं गॅलरींत आली. जिला भाऊ नाहीं तिनें भाऊबिजेच्या दिवशीं चंद्राला ओवाळावयाचें असतें हें तिनें एका मैत्रिणीकडून ऐकलेलें होतें. ती गॅलरींत आली आणि चंद्रासाठीं आकाशांत पाहूं लागली. पण चंद्र दिसेना. तो केव्हांच मावळला होता. तिला एकदम आपल्या भावाची आठवण झाली. चंद्र अस्ताला गेला तसाच तोही गेला, असा विचार तिच्या मनात आला. तिने तबक उचलले आणि क्षितिजापलीकडे गेलेल्या

चंद्राच्या रूपानें भावाला ओवाळून तबक खालीं ठेवतांच तिला जबरदस्त हुंदका आला. ती तशीच गॅलरीत आडवी होऊन स्फुंदूं लागली. ती अगदीं आवेगानें रडत होती. रडण्याचा आवाज येऊं लागला आणि शरीर थाडथाड उडूं लागलें. काकू एकदम धांवत आल्या. त्यांनीं तिला जवळ घेऊन समजवण्याचा प्रयत्न केला, पण ती अधिकच रडूं लागली.

रडतां रडतांच तिला झोंप लागली. साडेआकरा वाजतां मकरंद आला, तेव्हां त्याला ती गॅलरीत सतरंजीवर झोंपलेली आढळली. जवळच ओवाळणीचें तबक दिसलें. झटकन् सारा प्रकार त्याच्या ध्यानांत आला. तिला त्यानें उचललें नि कॉटवर ठेवून तो तिला हालवून हालवून उठवूं लागला. ती जागी झाली, पण उठली नाहीं. तिनें डोकें उशींत खुपसलें आणि ती मुसमुसूं लागली. मकरंदानें बऱ्याच वेळानें तिची कशी तरी समजूत घातली आणि तिला उठवून आंत नेलें. नेतांना त्यानें स्वतःच ओवाळणीचें तबक आंत नेलें आणि स्वतःच निरंजन भरून तें लावलें. निरंजनच्या प्रकाशांत उमाचा चेहरा उजळला आणि तिनें मकरंदला ओवाळलें. त्यानें झटकन् हाताच्या बोटांतली हिऱ्याची आंगठी काढली आणि तबकांत टाकली. तेवढ्यांत काकूंनी फराळाचें ताट पुढें केलें. मकरंद जेवून आला होता, पण तो फराळ करूं लागला. या सर्व प्रकारानें थोडीशी बावरून गेलेली उमा नुसती पहातच राहिली मकरंदानें एक करंजीचा तुकडा मोडला आणि उमाच्या पुढें केला. उमानें तो घेतला आणि ती हंसली. अगदीं मधुर हंसली! काकूंच्या चेहऱ्यावर संतोष नाचत होता. वहिनी मात्र तिकडे फिरकल्याहि नाहींत.

फराळ आटपल्यावर उमा जाऊन अंथरुणावर पडली. पण गेल्या तीन चार तासांत परस्परविरोधी भावनांचा असा कांहीं ताण तिच्या मनावर पडला होता कीं, तिची झोंप पार उडाली. तिच्या बोटांत सैलसर बसलेली आंगठी एक सारखी फिरवीत ती मकरंददादाच्या आतांच्या वर्तणुकीचा विचार करीत राहिली. बटन दाबल्याबरोबर विजेच्या दिव्यांतील तारा उजळून जातात तसें तिचें अंतःकरण त्याच्या त्या कृत्यानें उजळून गेलें होतें. मकरंदाविषयींचें विचार तिच्या मनात सारखें उसळूं लागले आणि जरा-

वेळानें कांहीं दिवसांपूर्वीचा एक प्रसंग तिच्या मनांत रंगू लागला.

श्रीकांताला घेऊन ती सारी-दादा, वहिनी, उमा–राणीच्या बागेंत गेलीं होतीं. उमा बाळाला रंगीबेरंगी पक्ष्यांची गंमत दाखवीत होती. इतक्यांत तिच्या कानावर दादा वैनीच्या संभाषणाचा थोडासा रागीट स्वर आला. तिनें त्यांच्याकडे वळून पाहिलें नाहीं. श्रीकान्ताला पक्ष्यांची मौजच ती दाखवीत राहिली. पण तिचे कान मात्र त्या संभाषणाकडे वळले होते. तीं दोघें इंग्रजींत बोलत होतीं. उमाला त्यांतले कांहीं फारसें कळत नव्हतें. इतक्यांत मकरंद रागानें मराठींत म्हणाला,

"तुला मी मागंच सांगितलं होतं कीं, हा विषय तूं पुन: काढूं नको. ताई मला अगदीं सख्या बहिणीसारखी आहे. माझ्या जीवांत जीव असेपर्यंत मी तिला अंतर देणार नाहीं"

उमाची नजर नकळतच त्याच्याकडे वळली. त्याचा चेहरा लालबुंद झाला होता. उमाच्या कानांवर या प्रकरणाची कुणकुण आलेली होती. वहिनींच्या वडिलांच्या एका स्नेह्याला उमा फार आवडली होती. त्याला कांहीं अपत्य नव्हतें. उमा ही मकरंदाची नुसती मानलेलीच बहिण आहे असें जेव्हां त्याला समजलें तेव्हां तिला दत्तक घेण्याची कल्पना त्याच्या मनांत आली आणि वहिनीमार्फत त्यानें ती मकरंदाच्या कानांवर घातली. ती ऐकल्याबरोबर मकरंद खवळला होता. हें उमाला समजलें तेव्हां तिला दादाचा कोण अभिमान वाटला! आज तो अभिमान द्विगुणित झाला आणि कृतज्ञतेचे आर्द्र भाव त्यांत दाटले!

× × +

उमाला हे सारे प्रसंग आठवले. पण आतां त्याचा काय उपयोग होता! चार महिन्यापूर्वीच मकरंद तिला, काकूंना, साऱ्या संसाराला सोडून निघून गेला होता. उमाच्या डोळ्यांतून पुन्हां अश्रू वाहूं लागले. सारें शून्य, अर्थशून्य वाटूं लागलें. ती तशींच भिंतीला टेकून अश्रू ढाळींत राहिली. इतक्यांत श्रीकांत तेथें आला. उमाताई तेथें बसलेली त्याच्या नजरेस पडली. तो तिच्याकडे धांवत गेला. आणि ताई म्हणून तिच्या गळ्याला त्यानें मिठी मारली. उमा कांहीं बोलली नाहीं. त्यानें

तिचें तोंड धरलें आणि तिच्या तोंडाजवळ आपले तोंड नेऊन तिला ' ताई ' ' ताई ' अशा हांका मारण्याचा सपाटा चालविला.

अखेर उमा उठली. त्याला तिनें उचललें; आणि त्याचा एक मुका घेऊन विचारलें,

" मी तुझी ताई का रे ? "

' होय ' मान हालवीत त्यानें उत्तर दिलें.

" कोण, ताई ! "

" होय, ताई—ताईच तूं माझी. " एवढें म्हणून तो हंसला आणि तिच्या उराशी त्यानें तोंड लपविलें.

उमाचा चेहरा एकदम उजळला. ती स्वतःशींच उद्गारली,

" एवढा सोन्यासारखा भाऊ असतांना मी असं वेड्यासारखं काय करीत बसले आहे ! "

तिनें तें तबक उचललें. श्रीकान्ताला घेऊन ती स्वयंपाकघरांत गेली. तेथें तिनें एक पाट मांडला. पाटासमोर चांदीचें ताट मांडलें. ताटासभोंवतीं रांगोळी काढली. यंदा त्यांच्याकडे दिवाळी नव्हती, पण शेजारून फराळाचे जिन्नस आले होते त्यांतले दोन ताटांत वाढले. तीनचार सुवासिक उदबत्त्या घेतल्या आणि त्या पेटवून ताटाशेजारी ठेवल्या तबकांतलें निरंजन विझलें होतें. तें पुनः लावलें. श्रीकान्त बाजूला उभा राहून हें सारें मुकाट्यानें पहात होता. निरंजनाची ज्योत उजळल्याबरोबर त्याचे डोळे प्रकाशले. उमानें त्याला उचलले आणि पाटावर बसविलें. हातांतली हिऱ्याची आंगठी घेऊन त्याच्या हातांत दिली आणि कुंकुमतिलक-अक्षता लावून त्याला ओवाळलें. आंगठी तबकांत टाकायची हें त्याला काय ठाऊक ! तो त्या साऱ्या प्रकारांकडे नुसता पहातांच राहिला. उमा त्याला कांहीं सांगणार, तोंच आड उभें राहून आदरपूर्ण नयनांनीं तें सारें पहात उभ्या असलेल्या काकू म्हणाल्या,

" बाळ, ती आंगठी टाक त्या तबकांत. "

श्रीकान्तानें आंगठी तबकांत टाकली. उमानें तबक खालीं ठेवलें आणि त्याला उचललें व त्याला धरून त्याचे भराभर मुके घेण्यास सुरवात केली.

---

# १ स्मशान....आणि घर

दादरच्या स्मशानांतून मी बाहेर पडलों आणि समुद्राकडे पाहत कट्ट्यावर उभा राहिलों.

जो समुद्र सकाळीं मला एखाद्या योग्याच्या समाधीसारखा शांत वाटत होता, ज्या समुद्राच्या किनाऱ्याशीं खेळणाऱ्या लाटा पाहून सकाळीं मला, पडल्यापडल्या अंगावर हंसणारें-खिदळणारें मूल खेळविणाऱ्या प्रसन्न पित्याची आठवण झाली होती त्याच समुद्राची भरती आतां विचित्र वाटत होती. उतरत्या सूर्याच्या प्रकाशांत त्या समुद्राची हालचाल उकळत्या पाण्याच्या कढाप्रमाणें भासत होती.

किनाऱ्यावर कांहीं मुलें खेळत होतीं. किनाऱ्यावर बांधलेला एक वाळूचा किल्ला लाटेनें ढांसळत होता. तो तसा ढासळतांना पाहून चार दोन मुलें हंसत होतीं आणि त्याच्या आसपास टाळया पिटीत नाचत होतीं—आणि ज्या मुलीनें हा किल्ला बांधला होता ती, आपलें हें विश्व डोळ्यांदेखत ढासळत असलेलें पाहून, मुळूमुळू रडत होती.

त्या नाचणाऱ्या मुलांची पावलें ओल्या वाळूवर उमटत होतीं—आणि समुद्राची लाट आली म्हणजे तीं वाळूंतली पावलें पुसून जात होतीं.

पलीकडे एक मनुष्य एका लहानशा मुलाला खेळवीत बसला होता. त्या मुलाच्या हातापायांच्या काड्या झाल्या होत्या, आणि त्याला आपलें जड डोकें सावरतां येत नव्हतें. रोगटपणाची सावली त्या पोराच्या अंगावर भेसूर पडली होती. तो मनुष्य त्या पोराला गुदगुल्या करून हंसवीत होता;—तें हंसत होतें कीं रडत होतें हें मात्र कळत नव्हतें.

मी पाण्याकडे पाहिलें. समुद्रांत कांहीं स्त्री-पुरुष पोहत होते. पाण्यावर त्यांची काळीं डोकीं तेवढीच दिसत होतीं. मला तीं काळयाकाळ्या मडक्यांप्रमाणें वाटलीं. मी दृष्टि किनाऱ्याकडे वळविली. तेथें कांहीं कावळे ओरडत उडत वाळूंतलं किडे चिवडीत होते.

माझी एकदम स्मशानाकडे दृष्टि गेली. आणि आंत जाणारा रस्ता ठसठशितपणें जाणवला.

मीं दूर समुद्राकडे पाहिलें. क्षितिजावर मच्छीमारी जहाजें शिडें पसरून संथ उभीं होतीं. आज किती तरी जहाजें जमा झालेलीं दिसलीं—दर हंगामांत नवनवीन जहाजें तयार होतात—मग जुनीं कुठें जातात ?—समुद्राच्या तळाशींच ना ?

समोर दोन बाजूच्या दोन टेकड्यांचीं टोकें समुद्रांत घुसलीं होतीं. त्या टेकड्या काळवंडलेल्या दिसत होत्या. त्यांच्यावरचीं झाडें दबा धरून बसल्यासारखीं दिसत होतीं. पण त्यांचीं टोकें मात्र उजळलेलीं होतीं. मी त्या टोकांकडे आळीपाळीनें पाहू लागलों. तों लाटांची एक मौज दृष्टीस पडली. दोनहि टोकांपाशीं समुद्राच्या फेसाळ लाटा उठत होत्या. टोकापासून जरा दूर पाण्यांत एकदम एक मोठी लाट उठे, टेकडीच्या टोकाकडे पसरत जाई—एक फेंसाळ बंधाराच निर्माण करीत पसरत जाई—आणि खडकावर आपटून नष्ट होई.

माझ्या मनांत विचार आला, हे दोनहि बाजूचे बंधारे एकमेकांना भेटले तर ! मग नेहमींचा एक विचार आठवला. हीं दोनहि बाजूच्या टेकड्यांचीं टोकें बांध घालून जोडलीं तर मुंबईच्या क्षेत्रफळांत किती भर पडेल ! सकाळीं समुद्रकांठीं फिरतांना हा विचार मीं कितीदां तरी मनांत घोळविला होता—कल्पनेनें येथें किती तरी जागा निर्माण केली होती, त्यावर इमारती उभारल्या होत्या, त्यांच्याभोंवतीं बागबगीचे बांधले होते...एक नवीन कॉलनीच तयार केली होती ! या कॉलनींत किती तरी मोटारी फिरल्या होत्या, इमारतींच्या खिडक्यांतून सुंदर चेहरे हंसले होते, पार्कमध्यें गोजिरवाणीं मुलें खेळलीं होतीं, बागेतल्या कोपऱ्यांनीं स्त्रीपुरुषांचे प्रणयालाप एकले होते, रस्त्याकडेच्या दुकानांनीं आरास मांडली होती...

पण आतां ? त्या जागेच्या ठिकाणीं ओहोटीच्या वेळची दलदल दिसूं लागली. त्यांत मधुनमधून थाण पाणी साचलें होतें. सांडपाण्याचीं दोन-तीन गटारें येऊन तेथें आपलें वैमव ओतून देत होतीं. ठिकठिकाणीं मेलेले, फुगलेले, कुजलेले, कावळ्यांनी अर्धवट खाल्लेले, मासे दिसूं लागले. एक कुत्र्याचें प्रेतहि आढळलें.

एकदम विलक्षण घाण सुटली. माझीं ज्ञानेंद्रियें जडावलीं—मी बधीर मेंदूनें पाहूं लागलो.

पाहतां पाहतां त्या दलदलीचें रूपांतर स्मशानांत झालें. ठिकठिकाणीं मातीचे लहान-लहान ढीग दिसू लागले. मुलांच्या स्मशानात खुणेचीं लाकडें उभारलेलीं असतात तशीं प्रत्येक ढिगावर दिसूं लागलीं ! —इत-क्यांत मघाचें तें मेलेलें कुत्रें एकदम जिवंत झालें आणि मातीचा एक ढीग उकरूं लागलें.

माझें अंग एकदम शहारलें. असें काय दिसतें आहे मला ? मला झालें आहे तरी काय ! पुन: पाहिलें. समोर समुद्र होता, मच्छीमारी जहाजें होतीं, दोनहि बाजूच्या टेकड्या होत्या—पण पुनः डोळ्यांसमोर तीं अभद्र दृश्यें आलीं !

मीं एकदम नजर वळविली. उजवीकडच्या बागेकडे पाहू लागलों. त्या बागेत उंच उंच माड आहेत ते लांब बांबूच्या झाडूसारखे भासले—

काय—झालें आहे काय माझ्या मेंदूला ? नेहमींच्या वस्तू आतां अशा कां दिसतात ?

मीं एकदम पाठ वळवून चालू लागलो—झपाट्यानें चालूं लागलों—

आणि जरासें मोकळें वाटलें पण थोड्याच वेळांत मनांत विचार येऊं लागले—मरगळलेले विचार ! जरा वेळानें मनांत चित्रें उमटूं लागलीं—अस्पष्ट, विस्कळित चित्रें ! हळुहळू दुपारपासूनचा एकेक प्रसंग डोळ्यां-समोर आकारूं लागला...

अकरा वाजण्याच्या सुमारास मी घरी येऊन जेवायला बसलों तोंच शेजारून हिकाळी आली. जेवण तसेंच टाकून मी धांवलों. मी दारापाशीं

गेलों तों डॉक्टर बाहेर पडत होते. काय झालें होतें तें त्यांनी सांगण्याची जरूरच नव्हती.

आठ दिवसांपूर्वीच अरविंदाला हृदयविकाराचा झटका आला होता. इतक्या तरुण, सशक्त इसमाला हा झटका आलाच कसा याचें डॉक्टरला आश्चर्य वाटलें. पण या दुखण्यांत साराच दैवदुर्विलास होता. तीन वर्षांपूर्वीपासून अरविन्दाच्या आईला हृदयविकार जडला होता. तुमची आई वर्षभराहून अधिक जगेलसें वाटत नाहीं असें डॉक्टरानें त्याला अलीकडेच सांगितलें तेव्हांची त्याची भेदरलेली नजर मला अजून आठवते. आणि आतां खुद्द त्याच्यावर त्याच रोगानें हल्ला केला !

काल संध्याकाळीं अरविन्दाला दुसरा 'ॲटॅक' आला होता—आणि आतांचा हा तिसरा अखेरचा ठरला. अरविन्द, आपली आई, तरुण पत्नी, सहा महिन्यांचें मूल आणि आयुष्याचीं अनेक मधुर स्वप्नें यांना टाकून निघून गेला !

मी आंत गेलों आणि अरविन्दाकडे नजर टाकली. त्याला झोंप लागली असावी असें वाटत होतें. पण तीनचार तासांनीं प्रेत उचललें, तेव्हां त्याचा चेहरा, नव्हे सारें शरीरच किती बदलून गेलें होतें ! मानवी शरीर विनाशी असतें हें तत्त्वज्ञान एकदम माझ्या काळजाला डसलें !

प्रेत बाहेर काढण्यासाठीं आम्ही त्याला हात घातला मात्र, 'नका हो माझ्या बाळाला नेऊं' असा हंबरडा त्याच्या आईनें फोडला. स्मशानाची वाट चालतांना ही करुण किंकाळी सारखी माझ्या कानांत घुमत होती.

स्मशानांत सर्व प्राथमिक विधि आटोपेपर्यंत प्रेत फुगायला लागलें होतें. अन् शरीर काळें-पिवळें-निळें दिसूं लागलें होतें. या रोगानें मेलेल्या माणसाचें रक्त झटकन् साकळतें. प्रेताला अग्नि देतांना, मित्राचा देह नष्ट होत आहे याच्या दुःखापेक्षा, ही घाण शक्य तितकी लवकर नजरेआड होईल हें [illegible] मनांत [illegible] त्या विचित्र भावने-[illegible] अपराधीपणा [illegible]

अखेरीस चिता चांगली भडकली. आतां जायला हरकत नाहीं असें वाटतें आहे तोंच ती एकदम कोसळली—आणि अरविन्दाच्या शरीराचा एक जळका भाग दृष्टीस पडला !

एका जिवाभावाच्या मित्राच्या शरीराचा जळका भाग—अन् त्याचें तें काळें, करपट मांस ! मला एकदम उबग आली. माझ्या भावना आंत कोणी तरी कुरतडतो आहे—फाटक्या वहाणेला रेशमी फडक्याची चिंधी गुंडाळावी तसें कांहीं तरी माझ्या मनाचें होत आहे, असें वाटूं लागलें. घशांत कसें तरी विचित्र व्हायला लागलें—

मी एकदम तेथून जायला निघालों—

तों समोरच एका मुलीचें प्रेत आणून ठेवलेलें ! त्या मुलीचें अंग—तिचे, गुंडाळलेल्या कापडाबाहेर पडलेले पाय आणि उघडा चेहरा यांना चमत्कारिक सूज आलेली होती. अंगावरची त्वचा टचटचित पण फिकट पिवळी, काळवंडलेली, रोगट, बुरसट दिसत होती. डोक्याचे बहुतेक केस गळले होते; त्यामुळें त्याचा आकार भयानक दिसत होता !

आणि या प्रेतावर फुलें, गुलाल, कलाबतू यांचा शृंगार होता ! कोणीतरी मोठ्या आवडीनें काळजीपूर्वक प्रसाधन करावें तसा तो केलेला होता ! कपाळावर अबीर फासलेला होता !

मला त्या मुलीच्या प्रेताकडे दुसरी नजर टाकण्याची हिंमत झाली नाहीं. मी जवळजवळ पळतच बाहेर आलों—आणि कट्टयावर उभा राहून समुद्राकडे नजर टाकली—

तों समुद्राचेंहि स्मशान झालें !

सारं जगच विचित्र, अभद्र दिसूं लागलें.

मी तेथून निघालों तरी त्या दृश्यांनीं माझी पाठ सोडली नाहीं. दुपारपासूनच्या प्रसंगांचीं सारीं दृश्यें एकमेकांत मिसळून, एकमेकांना ओरबडत, एकमेकांना खदखदा हंसत, माझ्या मनाच्या ओसरीत नाचत होतीं—विद्रूपपणें नाचत होतीं—

मी चालत होतों—आणि मनाच्या डबक्यांत या दृश्यांचीं भुतें थैमान घालीत होतीं !

शेजारच्या बिल्डिंगमधून रेडिओचा एकदम मोठा आवाज आला नि मी भानावर आलों. एखाद्या स्फोटाचा आवाज कानांत शिरावा तसा तो आवाज कानांत शिरला.

समोर रस्त्यामधल्या बागेंत कांहीं मुलें खेळत होतीं. सातआठ वर्षांची एक गोरीगोमटी गुबगुबित मुलगी हिरवळीवर एकटीच पडली होती. ती स्वत:शीच गुंग होती. मला एकदम स्मशानांत पाहिलेल्या त्या मुलीच्या प्रेताची आठवण झाली. तेथेंच दोन मुलें एकमेकांच्या तंगड्या धरून एकदम नाचण्याचा प्रयत्न करीत होतीं. पलीकडे दोनतीन मुलें एका मुलाला आडवा पाडून त्याच्या डोक्यापायाला धरून उचलण्याचा प्रयत्न करीत होतीं.

मला एकदम लहानपणाची आठवण झाली. तेव्हां इन्फ्लुएन्झाची सांथ जोराची होती. सहज रस्त्यावर उभें राहिलें तरीं एखादें प्रेत स्मशानाकडे चाललेलें दिसे. एकदां दुकानांत बसलों होतों तों समोरून दोन इसम बांबूला प्रेत गुंडाळून घेऊन चालले होते. 'प्रेत पोचवायला सुद्धां पुरेसे लोक नाहींत,' दुकानदार म्हणाला. तेव्हां तें दृश्य किती स्वाभाविक वाटलें होतें! लहानपणीं पाहिलेलें आणखी एक प्रेत आठवलें. त्याच्या अंगावरचें लाललाल कापड, त्यावर घातलेलें कापड, त्यावर घातलेले ताजेताजे टवटवित हार, कलाबतूचीं रुपेरी चमक, प्रेत नेतांना त्याच्यावर उधळलेला गुलाल.—मला त्या साऱ्याची गंमत वाटली होती. आणि आतां मला मुलांचा हा खेळ प्रेताच्या ओढाताणीसारखा वाटत होता!

मी त्या मुलांकडे आणखी न पाहतांच पुढे चालूं लागलों. मन जड, मारावलेलें झालें होतें. सारें कांहीं रुक्ष, शुष्क वाटत होतें. एका घराच्या तावदानावर सायंकाळच्या सूर्याचे किरण आग ओतीत होते—तो प्रकाश मला करपट वाटला! रस्त्याकडतच्या एका भाजीवाल्याच्या दुकानांत कांहीजण भाजी घेत होते. त्यांचे चेहरे त्या भाजीइतकेच शिळे दिसत होते. त्यांतला एक आपल्या थकलेल्या आवाजांत भाजीच्या दराबद्दल हुज्जत घालीत होता आणि इतर सारे ती मरगळलेल्या वृत्तीनें ऐकत होते. इतक्यांत समोरून एक वेणीवाला, एका कानावर हात ठेवून आपल्याच्याच

घाटांत ' मोगरी ' असें ओरडत आला आणि त्याबरोबर चारदोन बाया एकदम खिडकींत धांवल्या. मला त्या मुलीच्या प्रेतावरील फुलांची आठवण झाली !

मी तसाच उबगलेल्या वृत्तीनें चाललों होतों. बरा वेळानें एक मिठाईवाला आढळला. समोर मिठाई मांडून तो अर्धमिटल्या डोळ्यांनीं पाहात बसला होता. मिठाईवर माश्या घोंघावत होत्या आणि त्याच्या हातांतलें मळकट फडकें अधुनमधून निर्जीव हालचाल करीत होतें.

मला एकदम त्यांतली मिठाई घ्यावी आणि खावी असें वाटूं लागलें !

झालें होतें तरी काय मला ! मिठाईवर माश्या घोंघावत आहेत हें लगेच जाणवलें ! पण वाटलें, काय हरकत आहे खाल्ली म्हणून ! शरीराच्या घाणींत आणखी घाण मिसळेल, अधिक तें काय होईल !

माझ्या या विचारानें माझेंच मन शहारलें—स्वत:चीच किळस येत आहेसें वाटलें !

मी तसाच पुढें चालूं लागलों. मन निर्बोध झालें होतें. रस्त्यांतून लोक जातयेत होते. लोकांची घाई–गर्दी–धांदल–गडबड...अस्पष्ट ठसे मनावर उमटत होते. इतक्यांत एक सायकलस्वार जोरानें मला घासून गेला—जातांना त्यानें माझ्या खांद्यावर हात ठेवल्यासारखें केलें ! मी दचकून फूटपाथवर चढलों, तों शेजारीं संध्याकाळचीं वर्तमानपत्रें मांडून ठेवलेलीं जाणवलीं. एका पत्राच्या मथळ्यांकडे माझें लक्ष गेलें. ठळक अक्षरांत छापलें होतें: " एका बाईला तिळें ! " दुसरा एक मथळा सांगत होता: " गवतांत अन्नाचे गुण ! " त्याहि स्थितींत मला हंसूं आलें. तिळें झाल्यावर माणसांना गवत खाणें भागच आहे. मनुष्यस्वभावाची गंमत वाटली मला. माणूस गवत खाईल, पण जगण्याची धडपड करील. रस्त्यांतल्या प्रत्येक मनुष्याच्या हालचालींत मला ही जगण्याची धडपड —आटापीट दिसत होती.

एकदम मनांत विचार आला, माणूस गवत खायला तयार होतो तो केवळ जगण्याच्या ओढीनेंच का ? शास्त्रज्ञाची ही बुद्धि गवतांत अन्नांश शोधूं लागते ती माणसाचीच बुद्धि ! की पशूची ? हो पशूचीच !

पशूची नाहीं तर काय ? माणूस मुळांत पशूच आहे. मनुष्यत्व हा त्याचा नुसता बाहेरचा देखावा ! कातडीच्या आंत पाहा—किंवा असें करा. माणसाला व पशूला सरणावर टाका.—दोघांचें जळकें मांस सारखेंच दिसेल !

एकदम मोटरचा कर्ककर्कश आवाज कानांत शिरला. मी दचकलों व जागच्या जागींच थबकलों. मोटर मला भिडून उभी राहिली होती. एकदम ध्यानांत आलें, ड्रायव्हरनें ब्रेकची सारी शक्ति दाबून मोटार उभी केली म्हणून मी बचावलों. बचावलों म्हणून किती बरें वाटलें ! आतां मेलों असतों, या विचारानें अंतःकरणांत एकदम धसका बसला. पायांना कंप सुटला–नजर बावरली–क्षणांत भोंवतालीं जमलेली गर्दी अंगावर येत आहेसें वाटलें. मीं मोटारीकडे पाहिलें, ड्रायव्हर माझ्याकडे पाहून हंसला. मला एकदम आधार वाटला, तोंच मोटारींतून आवाज आला, ' सिली ब्रूट ! ' मीं पाहिलें, मोटारींत बसलेली स्त्री माझ्याकडे क्रुद्ध नजरेनें पाहत होती.

' सिली ब्रूट ' काय ! मला तिचा संताप आला. मींहि तिच्याकडे रागानें पाहिलें त्या स्त्रीचा चेहरा रंगरंगोटीनें मढविलेला होता. ही रंगरंगोटी खरवडून काढावी असें वाटलें. तों ती मोटार आणि ती स्त्री निघून गेली ! मनांत विचार आला, ही रंगरंगोटी खरवडून काढली कीं या बाईचा नखरा क्षणांत गळून पडेल ! पण मनानें लगेच कबुली दिली, ही स्त्री रंगरंगोटीशिवायसुद्धा सुंदर दिसली असती. पण काय उपयोग या सौंदर्याचा ? Beauty is skin-deep ! हिला सरणावर टाका म्हणजे कळेल तिचें खरें रूप !

ही सरणावर टाकण्याची कल्पना आतां मला थोडी गंमतीदार वाटूं लागली. समोर जो दिसेल त्याला सरणावर टाकण्याच्या कल्पनेशीं मी खेळूं लागलों सरणावर बसूं लागला म्हणजे याचें मांस कसें दिसेल हा विचार, हातांतली काठी रस्त्याकांठच्या खांबावर मारीत आणि तसा समोरच्या माणसावर हाणीत चालत होतों रस्त्यांत गर्दी दाटली होती. आजूबाजूची कुत्रीं आपला थाट मांडून बसलीं होतीं. गिऱ्हाईकें त्यांचें वैभव

न्याहाळीत होतीं, पारखीत होतीं. मला तें दीनवाणें वाटलें.—बरा वेळानें कांहीं वाटेनासेंचे झालें. नुसता गर्दीचे धक्केबुक्के खात चाललों होतों. इतक्यांत कोणी तरी ओळखीच्या आवाजांत हटकलें, "काय हो!"

मीं चमकून पाहिलें. तो ऑफिसमधला स्नेही होता. त्यानें विचारलें,

"आज तुम्ही ऑफिसला आला नाहीं!"

मीं त्याला कारण सांगितलें.

"आज तुम्हीं यायला हवं होतं. आधीं पेढे काढा. Happy news for you!"

मी त्याच्याकडे बावळट उत्सुकतेनें पाहात राहिलों.

"बॉसनें आज तुमच्या अर्जाचा निकाल दिला."

मी आतां, या वेळीं त्या अर्जाचं विसरूनच गेलों होतों. पण आतां अधीरतेनें विचारलें, "काय! काय दिला निकाल त्यानें!"

माझ्या आवाजांतला आवेग मलाच जाणवला.

"काय म्हणून काय विचारतां! He has accepted your application.आतां तुम्हाला नोकरी सोडण्याचं कारण नाहीं."

"असं" मी म्हणालों. माझ्या आवाजांत उत्साह होता. पण लगेच मनांत विचार आला, "नोकरी सुटत नाहीं, म्हणजे मालकाचें बंधन सुटत नाहीं. रोज सकाळची अकरा-चाळीसची गाडी सुटत नाहीं."

मित्र माझा निरोप घेऊन गेला. मी जागेवरच घोटाळून आजुबाजूला पाहिलें. आपण पॉप्युलर फार्मसीपुढं उभे आहों हें ध्यानांत आलें. फार्मसींतलीं औषधं नजरेस पडलीं. लगेच अरविन्दाच्या खोलींतल्या औषधाच्या बाटल्या माझ्या डोळ्यांसमोर आल्या. आतां त्या रिकाम्या खोलींत त्या बाटल्या कशा विचित्र दिसत असतील,—मनांत विचार आला.

मी चालूं लागलों. आपण भलत्याच रस्त्याला आलों आहोंत हें माझ्या ध्यानांत आलें. हिंदु कॉलनींत जाण्यासाठीं मी टिळकपुलाकडे वळलों. उजवीकडे रस्त्यावर कापडाचीं अनेक दुकानें होतीं. निर्वासित व्यापारी रस्त्यावर इमिटेशन रेशमी ठाणें मांडून बसले होते. गिऱ्हाइकें गोळा झालीं

होतीं. व्यापारी कापड मोजून देत होते. कांहींजण मोठमोठ्यानें भाव ओरडत होते. कांहीजणांच्या हातांतला गज पल्लेदार फिरत होता.

ही निर्वासितांची धडपड—जगण्यासाठीं धडपड! नेहमीं मला ती करुण वाटत असे; आतां केविलवाणी वाटायला लागली.

मी पुलापाशीं आलों तों एक दृश्य दृष्टीस पडलें. पुलाखालीं एक पंधरासोळा वर्षांचा भिकारी मुलगा मूर्च्छित पडला होता —घाणींत पडला होता. त्याच्या अंगावर, अंगावरच्या लक्तरांवर घाणीचीं पुटें चढलेलीं होतीं शेजारींच त्यानें ओकून ठेवलें होतें. त्याची पुटें तोंडावर बसलीं होतीं, अंगावरहि बसलीं होतीं. काळ्याकाळ्या माशा त्या साऱ्यावर बसत होत्या—उडत होत्या. त्या मुलाच्या शेजारींच एक म्हातारा भिकारी होता. तो त्याचा बाप असावा. तो शांतपणें, स्तब्धपणें, निःशब्दपणें त्या मुलाच्या बेशुद्ध कपाळाचीं चुंबनें घेत होता-सारखो चुंबनें घेत होता. त्याला आजुबाजूच्या जगाची, भोंवतालीं जमलल्या गर्दीची क्षिति नव्हती, जाणीवच नव्हती. तो त्या मुलाला शुद्धीवर आणण्यासाटीं कांहीं करीत नव्हता. त्याचें घाणीनें बरबटलेलें तोंडहि पुशीत नव्हता. त्याच्या अंगावर नाचणाऱ्या माशांनाहि हाकलीत नव्हता. तो फक्त त्याच्या कपाळाची चुंबनें घेत होता. मुलगा निपचित पडला होता, लोक स्वस्थ पाहत होते. त्या मुलाला औपधपाणी करण्याची कोणी खटपट करीत नव्हता— आणि तो म्हातारा त्या मुलाच्या कपाळाचीं नुसतीं चुंबनें घेत होता—चुंबनें घेत होता!

त्याच्या त्या सुकट चेहऱ्यावरच्या डोळ्यांतली करुण ओढ—आणि त्या ओढींतली ती माया—आंधळी, निर्बोध माया—नेणिवेंतली माया!

मी त्या मायेचें नवल करीत जाण्यासाठीं वळलों तों समोर प्रेताच्या सामानाचें दुकान दिसलें. ती माया एकदम करपली!—

मी जिना चढून पुलावर आलों. पुलावर गर्दी उसळली होती. ऑफिसमधून घरीं जाणारांची, फिरायला जाणाऱ्यायेणारांची, फूटपाथवर जिन्नस विकणारांची, बससाठी वाट पाहणारांची – साऱ्यांची गर्दी! त्या गर्दींत माझा जीव घुसमटू लागला. एखादी बस अगर लॉरी डोळ्यांत

रस्त्यावरून धाडधाड करीत जाई आणि मनांत धडधड होई. वाटे, या लॉरीखालीं सांपडलों तर ! ह्यां विचारानें एकदम धसका बसे.

इतक्यांत पुलाखालून एक मालगाडी भकभकत, धुराचे लोळ सोडीत गेली. उलट दिशेनें एक फास्ट लोकल धडाड–धडाड करीत गेली. समोरून एक माणसांचा लोंढा आला !

त्यांतलीं कांहीं मुलेंमुली मोठमोठ्यानें हंसतखिदळत होतीं. त्यांना इतका हा उत्साह आला कोठून? बाजूला पाहिलें, पुलाच्या लोखंडी पत्र्यावर नाना पत्रकें लावलेलीं होतीं. कांहीं पत्रकें हातानें लिहिलेलीं होतीं. कांहीं पत्रकें रंगीबेरंगी, चित्रांकित होतीं. मध्येंच कोणीतरी रंगाच्या चुन्यानें मोठ्या अक्षरांत एका पुढाऱ्याचा जयजयकार रेखाटला होता.

हा इतका उत्साह आला कोठून ! मीं रस्त्यावरच्या लोकांकडे पाहिलें. प्रत्येक जण उत्साहानें जात–येत–बोलत होता. हा उत्साह माझ्यांत शिरतो आहेसें वाटलें—आणि मला चमत्कारिक झालें. मीं स्वत:ला आवरूं लागलों.

पण नकळत पायांत गती शिरली. मीं घरीं येऊन बेल वाजविली. त्याबरोबर आतून माझ्या मुलाचा आवाज आला,

" दादा आले, दादा आले—माझे दादा आले."

त्याचीं दरवाजाकडे दुडुदुडु धांवत येणारी पावलें ऐकूं आलीं. तोंडानें, ' माझे दादा—माझे ' चालू होतें.

त्याचे ते शब्द—'माझे दादा–माझे'–ऐकल्याबरोबर माझ्या मनावर उत्साहाचा शिडकावा होतों आहेसें वाटलें. मी खेळकर हातांनीं माझ्या नांवाच्या पाटीवरच्या ' इन् आउट 'ची पट्टी मागें पुढें सरकवूं लागलों.

दरवाजा उघडला तेव्हां मुलाच्या ' माझे दादा 'चें गाणें झालें होतें !

मला पाहिल्याबरोबर त्यानें विचारलें, " दादा, तुम्ही आलेत ?— तुम्ही कुठं गेलां होता ? "

मी त्याला आवेगानें उचलून घेतले आणि त्याचे पटापट मुके घेण्यास सुरवात केली. नंतर त्याला घेऊन खोलींत गेलों आणि रेडिओ सुरू केला.

---

卐 卐 卐

याच लेखकाची इतर पुस्तकें—

आजकालचा महाराष्ट्र ( सहकार्यानें )
प्रकाशांतील व्यक्ति ( व्यक्तिरेखा )
कलेचीं क्षितिजें ( टीकात्मक )
तीन तपस्वी ( टीकात्मक )
पाकिस्तान की पन्नास टक्के ?
व्याधाची चांदणी ( कथासंग्रह )
कृष्णकमळीची वेल ( कथासंग्रह )

卐 卐 卐